# महाराष्ट्र विधानपरिषद

## दुसरे (पावसाळी) अधिवेशन, २०१९

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

### जव्हार (जि.पालघर) येथील कर्णबधीर मुलांच्या शाळेचे थकीत अनुदान देण्याबाबत

**(१) १९७२९ (२०-०८-२०१६). श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.ख्वाजा बेग :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जव्हार (जि.पालघर) येथील 'निलेश मुर्डेश्वर कर्णबधीर मुलांची शाळा, प्रगती प्रतिष्ठान नावाची संस्था मागील ३० वर्षापासून चालवित आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, कर्णबधीर मुलांना शिक्षणाच्या मुख्य प्रवाहात आणण्यासाठी त्यांच्या शाळांना शासकीय अनुदान मिळते परंतु संस्थेच्या या शाळेचे मागील सात वर्षापासून शासनाकडे अनुदान थकीत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, मागील वर्षभरापासून ठाणे आणि पालघर समाजकल्याण विभागात पाठपुराव्यानंतर एप्रिल, २०१६ मध्ये फक्त रुपये ७ लाख ३५ हजार ६७० इतकी रक्कम संस्थेस देण्यात आली असून रुपये १७ लाख ३ हजार ५८९ शासनाकडून येणे शिल्लक आहे, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने चौकशी करुन उर्वरित रक्कम विनाविलंब संबंधित संस्था/शाळेला मिळण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (१८-०३-२०१९) :** (१), (२) व (३) हे अंशत: खरे आहे.
(४) आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांच्यास्तरावर थकीत वेतनेत्तर अनुदान देण्याबाबतची कार्यवाही करण्यात येत आहे.

---

## विशेष शाळेतील शिक्षकांना नियमित वेतन देण्याबाबत

**(२) २००२७ (१९-०८-२०१६). श्री.कपिल पाटील :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) विशेष शाळेतील शिक्षकांचे वेतन नियमित करण्यासाठी लेखाशीर्ष बदलण्याचा व वेतन मुंबईतील अनुदानित माध्यमिक शिक्षकांप्रमाणे ईसीएसद्वारे करण्याचा निर्णय सामाजिक न्याय विभागाने घेतला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, विशेष शाळांच्याबाबत सामाजिक न्याय मंत्री यांच्या दालनात झालेल्या बैठकीतील निर्णयाचे स्वरुप काय,
(३) तसेच याबाबत शासनाने काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे ?

**श्री.राजकुमार बडोले (१५-०३-२०१९) :** (१) नाही.
(२) मा.मंत्री (सा.न्या.) यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ३/१०/२०१८ रोजी संपन्न झालेल्या बैठकीमध्ये आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांच्यास्तरावर तात्पुरत्या स्वरुपात शालेय शिक्षणाच्या पोर्टलचा वापर करता येईल का, ते तपासून आपले स्वतंत्र पोर्टल तयार करावे, असा निर्णय घेण्यात आला.
(३) प्रश्नच उद्भवत नाही.

---

## धुळे येथील सामाजिक न्याय भवनाचे काम प्रलंबित असल्याबाबत

**(३) २१७०७ (१९-०८-२०१६). श्री.चंद्रकांत रघुवंशी :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) धुळे येथील सामाजिक न्याय भवनाचे काम निधी अभावी प्रलंबित असल्याचे माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने निधी उपलब्ध करुन देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (१२-०३-२०१९) :** (१) होय, हे अंशत: खरे आहे.
(२) विभागाच्या दिनांक ३१/३/२०१६ च्या शासन ज्ञापनान्वये डॉ.बाबासाहेब आंबेडकर सामाजिक न्याय भवन, धुळे या इमारतीच्या बांधकामाच्या सुधारीत अंदाजपत्रकास मान्यता देण्यात आली असून सार्वजनिक बांधकाम विभागाकडे निधी वर्ग करण्यात आला आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात मिठाई कारखाने व मिठाई दुकानांची तपासणी करण्याबाबत

**(४) २३८०५ (१६-१२-२०१६). श्री.जयंत पाटील, श्री.किरण पावसकर, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.हेमंत टकले :** सन्माननीय **अन्न व औषध प्रशासन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) महाराष्ट्र राज्यामध्ये गणेशोत्सव व दिपावली या सणाच्या दिवशी ग्राहक मोठ्या प्रमाणावर मिठाईची खरेदी करतात, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, नागरिकांच्या आरोग्यावर कोणताही परिणाम होवू नये म्हणून अन्न व औषध प्रशासन विभागाकडून मिठाई बनविण्याचे कारखाने व मिठाई दुकानांची तपासणी करण्यात येते, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर तपासणीमध्ये सन २०१५ व २०१६ या वर्षात किती दुकानदार दोषी आढळले व त्यांच्यावर कोणती कारवाई करण्यात आली,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीश बापट (१८-०३-२०१९) :** (१) हे खरे आहे.
(२) हे खरे आहे.

(३) अन्न व औषध प्रशासनाकडून राज्यात सन २०१५-१६ या कालावधीत राबविलेल्या विशेष मोहिमेत केलेल्या कारवाईमध्ये मिठाई, खवा, खाद्यतेल व इतर अन्न पदार्थाचे एकूण १६६१ नमुने विश्लेषणासाठी घेण्यात आले होते. त्यापैकी १५१० नमुने प्रमाणित दर्जाचे, १२१ नमुने कमी दर्जाचे, ३० नमुने असुरक्षित घोषित झाले होते. १२१ कमी दर्जाच्या नमुन्याप्रकरणी संबंधितांविरुध्द न्यायनिर्णय खटले दाखल करण्यात आले असून, ३० असुरक्षित प्रकरणी मा.न्यायालयात खटले दाखल करण्यात आले आहेत.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## उपजिल्हा रुग्णालय परंडा (जि.उस्मानाबाद) येथे ट्रॉमा केअर युनिट करण्याबाबत

**(५) २६०५८ (१६-१२-२०१६). श्री.सुजितसिंह ठाकूर :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) उपजिल्हा रुग्णालय परंडा (जि.उस्मानाबाद) या ५० खाटांच्या रूग्णालयांचे १०० खाटांचे रुग्णालय व ट्रॉमा केअर युनिट करणे प्रस्तावित आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, परंडा शहरातील रुग्णांची वाढती संख्या लक्षात घेऊन १०० खाटांचे रुग्णालय ट्रॉमा केअर युनिट करण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (१२-०३-२०१९) :** (१) हे खरे आहे. लोकप्रतिनिधीची मागणी आहे.
(२) उपजिल्हा रुग्णालय, परंडा येथील रुग्णालयाची जागा अत्यंत अपुरी असल्याने जागा मिळविण्याबाबत कार्यवाही सुरु आहे. प्रस्ताव प्राप्त करुन घेण्याची कार्यवाही सुरु आहे.
(३) विलंबाचा प्रश्न उद्भवत नाही.

---

## बससेवा सुविधेची माहिती बेस्ट प्रशासनामार्फत प्रवाशांना देण्याबाबत

**(६) २८३२४ (१३-०४-२०१७). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील मध्य व पश्चिम रेल्वे मार्गावरील प्रवाशांना मध्यरात्रीनंतर प्रवासाची होणारी गैरसोय दूर करण्याकरीता बेस्टने दिनांक १ डिसेंबर, २०१६ रोजीपासून दादर रेल्वे स्थानक (पूर्व), मुंबई येथून विविध ठिकाणी बसची सेवा सुरु केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त बससेवा सुविधेची माहिती बेस्ट प्रशासनामार्फत प्रवाशांना देण्यात आली नसल्यामुळे प्रवाशांची गैरसोय होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून सदर सुविधेची माहिती बेस्ट प्रशासनामार्फत प्रवाशांना देऊन प्रवाशांची होणारी गैरसोय दूर करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२७-०२-२०१९) :** (१) मुंबईतील मध्य व पश्चिम रेल्वे सेवा मध्यरात्री बंद झाल्यानंतर प्रवाशांच्या सोयीकरीता दादर रेल्वे स्थानक (पूर्व) येथून गोराई आगार, ओशिवरा आगार, मुलुंड स्थानक (पश्चिम) व कोपरखैराणे (नवी मुंबई) या ठिकाणी रात्रीच्या वेळी जाण्याकरीता बेस्ट उपक्रमामार्फत बससेवा उपलब्ध करुन देण्यात आली होती.

(२) व (३) बेस्ट उपक्रमाने दिनांक २९/११/२०१६ रोजी प्रसिध्दीपत्रकाद्वारे सदर माहिती वृत्तपत्रे, इतर प्रसिध्दी माध्यमांद्वारे प्रवाशांना उपलब्ध करुन दिली होती.

तथापि, सदर सेवा प्रवाशांच्या अल्पप्रतिसादामुळे बंद करण्यात आली असल्याचे बेस्ट प्रशासनामार्फत कळविण्यात आले आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई कृषी उत्पन्न बाजार समितीची सुरक्षा कंत्राटदाराने फसवणूक केल्याबाबत

**(७) २९०७० (१२-०४-२०१७). प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **पणन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई कृषी उत्पन्न बाजार समितीच्या सुरक्षेसाठी श्वान पथकाचे कंत्राट मार्शल डॉग स्क्वॉड या कंपनीला देण्यात आले असून नियमाप्रमाणे मासिक हजेरीपत्रक सुरक्षा अधिकाऱ्यांच्यावतीने उप सचिवांमार्फत लेखा विभागात न पाठवता कंत्राटदाराने हजेरी पुस्तकांवर उप सचिवांच्या बनावट सह्या केल्याचे माहे नोव्हेंबर-डिसेंबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी फसवणूक करणाऱ्या कंत्राटदाराची चौकशी करुन कंत्राट रद्द करणे व कंत्राटाचे संपूर्ण पैसे वसूल करण्याबाबत शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (२८-०३-२०१९) :** (१) होय.

(२) या बाजार समितीने संबंधित कंत्राटदाराचा ठेका रद्द केला असून येथे असलेली संपूर्ण रक्कम कंत्राटदाराकडून वसूल करण्यात आली आहे.

तसेच सदर प्रकरणाची बाजार समितीस्तरावर चौकशी अधिकारी नेमुन चौकशी करण्यात आली आहे. चौकशीत दोषी ठरलेल्या मुख्य सुरक्षा अधिकारी यांच्या तीन वेतनवाढी, तीन वर्षाकरीता रोखण्याची आणि उर्वरित दोन सुरक्षा अधिकाऱ्यांच्या प्रत्येकी एक वेतनवाढ, एक वर्षासाठी रोखण्यात आली आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मराठवाडा विभागातील सर्व जिल्हा परिषदांकडे जिल्हा परिषद शिक्षकांच्या आंतरजिल्हा बदल्यांचे प्रकरणाबाबत

**(८) ३०२०५ (१७-०४-२०१७). श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मराठवाडा विभागातील सर्व जिल्हा परिषदांकडे जिल्हा परिषद शिक्षकांच्या आंतरजिल्हा बदल्यांचे माहे जानेवारी, २०१७ अखेर जिल्हानिहाय किती प्रकरणे मंजूरी अभावी प्रलंबित आहेत,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणे प्रलंबित असण्याची सविस्तर कारणे काय आहेत,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणे मंजूर करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१४-०२-२०१९) :** (१), (२) व (३) राज्यातील जिल्हा परिषद शिक्षकांच्या आंतरजिल्हा बदलीसाठी शासन निर्णय, दिनांक २४/४/२०१७ अन्वये सुधारित धोरण निश्चित करण्यात आलेले आहे. या धोरणानुसार जिल्हा परिषद शिक्षकांच्या आंतरजिल्हा बदल्या ऑनलाईन संगणकीय प्रणालीद्वारे करण्यात येत असून, जिल्हा परिषद शिक्षकास आंतरजिल्हा बदली हवी असल्यास अशा शिक्षकांनी ऑनलाईन अर्ज सादर करणे आवश्यक आहे. या प्रणालीच्या माध्यमातून सन २०१७ मध्ये राज्यात जवळपास ५००० जिल्हा परिषद शिक्षकांच्या आंतरजिल्हा बदल्या करण्यात आल्या असून सन २०१८ मध्ये दुसऱ्या टप्प्यात जवळपास ३००० शिक्षकांच्या आंतरजिल्हा बदल्या करण्यात आलेल्या आहेत. यास्तव जिल्हा परिषद शिक्षकांच्या आंतरजिल्हा बदल्यांची प्रकरणे प्रलंबित राहण्याचा प्रश्न उद्‌भवत नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## जळगाव-जामोद (जि.बुलढाणा) येथील पंचायत समितीमध्ये कार्यरत केंद्रप्रमुख तथा प्रभारी शिक्षण विस्तार अधिकारी यांच्या शासकीय दैनंदिन कामात अनियमितता झाल्याबाबत

**(९) ३१०१८ (११-०८-२०१७). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले, श्री.धनंजय मुंडे, ॲड.निरंजन डावखरे, ॲड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जळगाव-जामोद (जि.बुलढाणा) येथील पंचायत समिती येथे कार्यरत असलेले श्री.दि. रा. देशमुख, केंद्रप्रमुख तथा प्रभारी शिक्षण विस्तार अधिकारी यांनी माहे जानेवारी, २०१५ ते मार्च, २०१५ मध्ये शासकीय दैनंदिन कामात अनियमितता केली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणाच्या चौकशीबाबत संबंधितांकडून विधिमंडळाला अतारांकित प्रश्नाच्या उत्तरात चुकीची व दिशाभूल करणारी माहिती पुरविण्यात आल्याबाबत श्री.दिनकर रामभाऊ भालतडक यांनी दिनांक ०६ मार्च, २०१७ रोजी वा त्यासुमारास मा.मुख्यमंत्री, मा.मंत्री ग्रामविकास, तसेच सचिव, शालेय शिक्षण विभाग यांना निवेदन दिलेले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, समितीच्या तक्रारी संदर्भात चौकशी अहवालात श्री.दि. रा. देशमुख यांचेवर आरोपसिध्द होऊन दिनांक ०६ सप्टेंबर, २०१६ मध्ये ज्ञापनान्वये दोषारोपपत्र बजावण्यात आले असतानाही शालेय शिक्षण विभागाने कोणतीच कार्यवाही केली नसून मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलढाणा यांच्या आदेशान्वये त्यांना पुन्हा शासन सेवेत घेण्यात आले आहे, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, सदर निवेदनानुसार आतापर्यंत शासनाने कोणती कार्यवाही केली वा प्रस्तावित करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१५-०३-२०१९)** : (१) हे खरे आहे.

(२) हे खरे आहे.

(३) श्री.दि.रा.देशमुख, केंद्रप्रमुख, जळगांव-जामोद, जि.बुलढाणा यांना विभागीय चौकशीतील अंतिम निर्णयास अधिन राहून, पुर्नस्थापना देण्यात आली आहे.

(४) श्री.दि.रा.देशमुख, केंद्रप्रमुख, जळगांव-जामोद, जि.बुलढाणा यांचेविरुध्द त्यांनी सन १९९६ पासून सेवेमध्ये केलेल्या अनियमिततेबाबतचे सर्व दोषारोप एकत्रित करुन सुधारित दोषारोपपत्र बजावण्यात आले असून सदर प्रकरणी त्यांची विभागीय चौकशी सुरु आहे. विभागीय चौकशीचा अंतिम निर्णय प्राप्त झाल्यानंतर त्यांचेविरुध्द नियमानुसार शिक्षेची/शास्तीची कार्यवाही करण्यात येईल.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## दाभा मानकर (ता.केळापूर, जि.यवतमाळ) येथील सरकारी रोडवर अतिक्रमण करून पक्के बांधकाम केल्याबाबत

**(१०) ३१०७० (१८-०८-२०१७). श्री.हरिसिंग राठोड :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) दाभा मानकर (ता.पांढरकवडा, जि.यवतमाळ) येथील ग्रामपंचायत हद्दीतील वार्ड क्र. २ मध्ये रस्त्यावर अतिक्रमण करून पक्के बांधकाम करून अडथळा निर्माण केल्याची तक्रार स्थानिकांनी पंचायत समिती, पांढरकवडा यांच्याकडे माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादम्यान केली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर तक्रारीची दखल तहसिलदार व गटविकास अधिकारी (बिडीओ) यांनी घेतली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२२-०२-२०१९) :** (१) होय.

(२) हे खरे नाही.

(३) दाभा मानकर (ता.पांढरकवडा, जि.यवतमाळ) येथील स्थानिकांनी पंचायत समिती, पांढरकवडा यांच्याकडे श्री.प्रेमदास भोजराज राठोड यांनी सरकारी रोडवर अतिक्रमण करुन पक्के बांधकाम करुन जनतेला अडथळा निर्माण केल्याबाबत दि.०६/०४/२०१७ रोजी तक्रार केली.

सदर तक्रारीच्या अनुषंगाने विस्तार अधिकारी, पंचायत समिती पांढरकवडा यांनी दि.०८/०५/२०१७ रोजी दाभा मानकर येथे भेट देऊन यासंदर्भातील कागदपत्रे उपलब्ध करुन देणेबाबत सूचना दिल्या तसेच दि.२१/०७/२०१७ रोजीच्या ग्रामपंचायत मासिक सभेमध्ये यासंदर्भात चर्चा करण्यात आली. यामध्ये सदर जागेवर श्री.प्रेमदास भोजराज राठोड यांचा पूर्वीपासूनच गुरांचा गोठा होता. त्या ठिकाणी सार्वजनिक रस्ता नव्हता. त्यामुळे त्याच जागेवर त्यांनी पक्के बांधकाम केले आहे व ग्रामस्थांना सदर बांधकामाचा कोणताही त्रास नसल्याने त्याच जागेवर श्री.राठोड यांनी पक्के बांधकाम करण्याबाबत ग्रामसभेने सहमती दर्शविली. तथापि, या जागेची मोजणी

दि.२४/०७/२०१७ रोजी करण्याचे सभेने निश्चित केले. परंतु, सदर मोजणीच्या दिवशी तहसिलदार, तलाठी इ. कोणतीही यंत्रणा उपस्थित नसल्याने शाखा अभियंता यांनी मोजणी केली नाही. तद्‌ननंतर ग्रामसभेमध्ये दि.२२/०९/२०१७ रोजी पुन:श्च या विषयावर चर्चा करण्यात आली. परंतु सदरच्या जागेमुळे रहदारीस तसेच ग्रामस्थांना कोणताही त्रास नसल्याने व जागेची मोजणी केल्यास वाद उद्‌भवत वण्याची शक्यता असल्याने जागेची मोजणी न करण्याचा ठराव दि.२२/०९/२०१७ रोजीच्या सभेमध्ये घेण्यात आला.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात काही मोठ्या औषध कंपन्या किंमतीसंदर्भात परवानगी न घेता नवीन औषधे विक्री करीत असल्याबाबत

**(११) ३११२५ (११-०८-२०१७). श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील :** सन्माननीय **अन्न व औषध प्रशासन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात काही मोठ्या औषध कंपन्या किंमतीसंदर्भात परवानगी न घेता नवीन औषधे बाजारात विक्री करीत असल्याचे माहे जून, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या कंपन्यांना औषधे उत्पादन केलेल्या तारखेपासून बॅचवाईस उत्पादन विक्री दाखल्यासहित तसेच गैरपालनाच्या कारणांसहित एक महिन्यात जमा करण्यास सांगितले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, तद्‌नुसार औषध वैद्यता, उत्पादन व एमआरपी दाखल्यासहित शासनाकडे जमा करण्याबाबत तसेच दोषी औषध कंपन्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीश बापट (२७-०२-२०१९) :** (१) अंशत: खरे आहे.

केंद्र शासनाच्या अधिपत्याखालील राष्ट्रीय औषध नियंत्रण प्राधिकरण (NPPA) यांनी देशातील ६७ मोठ्या औषध उत्पादक कंपन्याना त्यांनी उत्पादन

केलेल्या नवीन औषधाच्या किंमतीबाबत मान्यता न घेता नवीन औषधे, औषध किंमत नियंत्रण आदेश २०१३ च्या तरतुदीचे अनुपालन न करता बाजारात आणल्याबाबत नोटीस बजावली असल्याचे वृत्त बिजनेस स्टॅन्डर्ड व इंडियन एक्सप्रेस यांचे माध्यमातून दिनांक १८ मे, २०१७ व त्यादरम्यान प्रसिध्दस दिले असल्याचे अन्न व औषध प्रशासनाच्या निदर्शनास आले आहे.

(२) अंशत: खरे आहे.

प्रस्तूत प्रकरणी केंद्र शासनाच्या अधिपत्याखालील राष्ट्रीय औषध नियंत्रण प्राधिकरणाने उक्त औषध उत्पादक कंपन्याना कंपन्यांना औषध उत्पादन केलेल्या तारखेपासून बॅचवाईस उत्पादन आणि व्रिकी दाखल्यासहित तसेच गैरपालनाच्या कारणांसहित एक महिन्यात जमा करणेबाबत करणेबाबत सांगितले आहे.

(३) सदर प्रकरणी DPCO (Drug Price Control Order) अंतर्गत राष्ट्रीय औषध नियंत्रण प्राधिकरण (NPPA) द्वारे त्यांच्यास्तरावर संबंधिताविरुध्द कारवाई करण्यात येते किंवा त्यांनी राज्यातील औषध नियंत्रकास कळविल्यास त्यानुसार राज्यातील अधिकाऱ्यांकडून कारवाई करण्यात येते. तथापि, प्रस्तूत प्रकरणी सद्य:स्थितीत राष्ट्रीय औषध नियंत्रण प्राधिकरण (NPPA) यांच्यास्तरावर तपास/कार्यवाही सुरु आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील महिलांवर होणाऱ्या अत्याचाराला आळा घालण्याबाबत

**(१२) ३१२३२ (११-०८-२०१७). श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात सन २०१६ मध्ये ९७ महिलांवर अत्याचाराच्या घटना घडल्या असून १७७ महिलांचा विनयभंग झाला असल्याचे माहे मार्च, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, हुंडाबळीची समस्या आजही कायम असून ७ महिलांना हुंड्यासाठी जीव गमवावा लागला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, अन्य कारणांसाठी १० महिलांचे खून, ३ महिलांचे खूनाचे प्रयत्न तर २९ महिलांना आत्महत्येस प्रवृत्त केल्याच्या तक्रारी नोंद झाल्या आहेत, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, राज्यातील महिलांवर होणाऱ्या अत्याचाराला आळा घालण्यासाठी महिला अत्याचार विरोधी कायदे प्रभावीपणे राबवून दोषसिध्दतेचे प्रमाण वाढविण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०८-०३-२०१९) :** (१) हे खरे नाही.

राज्यात सन २०१६ - १७ मध्ये महिलांचा विनयभंग ११३८८, बलात्कार ४२०९, बलात्काराचा प्रयत्न ६ इतके गुन्हे नोंदविण्यात आले आहेत.

(२) हे खरे नाही.

राज्यात सन २०१६ - १७ मध्ये हुंडाबळीचे २६३ इतके गुन्हे नोंदविण्यात आले आहेत.

(३) हे खरे नाही.

राज्यात सन २०१६ - १७ मध्ये महिलांचे खून ६३५, खूनाचा प्रयत्न ४५३ इतके गुन्हे नोंदविण्यात आले आहेत.

(४) राज्यातील महिलांवर होणाऱ्या अत्याचाराला आळा घालण्यासाठी प्रतिबंधात्मक उपाययोजना खालीलप्रमाणे आहे. :-

- महिलांवरील अत्याचारास प्रतिबंध करण्यासाठी महिला अत्याचार प्रतिबंधक विभागाची स्थापना करण्यात आली आहे. विशेष पोलीस महानिरीक्षक हे विभागाचे प्रमुख आहेत.
- महिलांवरील अत्याचाराची प्रकरणे तातडीने निकाली काढण्याकरीता राज्यात २७ विशेष न्यायालये व २५ जलदगती न्यायालये स्थापन करण्यात आलेली आहेत.
- पोलीस आयुक्तालये / जिल्हयांमध्ये महिला सुरक्षा समित्या व महिला सहाय्य कक्षाची स्थापना करण्यात आली आहे.
- बलात्कारासारख्या गंभीर गुन्हयांचा तपासाची कार्यपध्दती बाबतच्या मार्गदर्शक सूचना सर्व पोलीस घटकांना वितरीत केलेल्या आहेत.

- हुंडाबळीकरीता प्रतिबंधात्मक उपाय प्रत्येक जिल्ह्यात दक्षता समित्या स्थापन करण्यात आलेल्या आहेत.
- छेडछाड व विनयभंगाच्या घटना रोखण्यासाठी पायी पेट्रोलिंग, शाळा कॉलेजच्या परिसरात प्रतिबंधात्मक उपाययोजना, नाकाबंदी, महिला सुरक्षा व छेडछाड पथके तयार करण्यात आली आहेत.
- मा.सर्वोच्च न्यायालय, दिल्ली विशाखा निर्णयाप्रमाणे पोलीस घटकांमध्ये तक्रार समित्या (Complaint Committees) स्थापन करण्यात आल्या आहेत. कामाच्या ठिकाणी लैंगिक अत्याचार प्रतिबंधक कायदा-२०१३ देखील अंमलात आला आहे.
- महिलांवरील अत्याचाराची प्रकरणे तपासासाठी आणि त्यांचा वेळोवेळी आढावा घेण्यासाठी जिल्हास्तरावर दिनांक १२/१०/२०१७ च्या शासन निर्णयानुसार विशेष पथके गठीत करण्याचा निर्णय घेतला आहे.
- राज्यात मुंबईसह पुणे शहर, ठाणे शहर, नागपूर शहर, पुणे ग्रामिण, यवतमाळ, अहमदनगर येथे Investigation Units for Crime Against Women (IUCAW) स्थापन केली आहेत.
- दिनांक ३१/०३/२००८ रोजी राज्य गुन्हे अन्वेषण विभागात अनैतिक वाहतूक प्रतिबंध कक्षाची स्थापना करण्यात आलेली आहे. महाराष्ट्र राज्यात १२ घटकांमध्ये केंद्र शासन व राज्य शासनाच्या अधिपत्याखाली स्वतंत्र अनैतिक मानवी वाहतूक प्रतिबंधक कक्ष स्थापन करण्यात आला आहे.
- समस्याग्रस्त महिलांचे समुपदेशन करण्यासाठी पोलीस स्टेशनमध्ये महिला पोलीस कक्ष स्थापन करण्यात आली आहेत. मा.धर्माधिकारी समितीने सुचविलेल्या शिफारशीनुसार रेल्वे स्टेशन परिसर व एस.टी. स्टँण्ड येथे एकूण ३६४ ठिकाणी महिला मदत केंद्र सुरु करण्यात आली आहेत.
- स्त्रीभ्रुण हत्या रोखण्याकरीता जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हा टास्क फोर्सची निर्मिती करण्यात आली आहे. स्त्रीभ्रुण हत्येची तक्रार दाखल करण्यासाठी टोल फ्रि क्रमांक १८००२३३४४७५ व www.amchimulgi. gov.in हा ई-मेल उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

- मुंबई, ठाणे व नवी मुंबई क्षेत्रातील संकटातील महिलांच्या मदतीकरीता टोल फ्रि हेल्पलाईन क्र. "१०३" व उर्वरित क्षेत्राकरीता "१०९१" सुरु करण्यात आली आहे. रेल्वे पोलीस घटक, मुंबई व पुणे ९८३३३३११११, नागपुर ०७१२-२७४३९८४ व बहन्मुबई पोलीस घटकात २४ तास कार्यरत असणारी हेल्पलाईन सेवा कार्यरत आहे. याशिवाय www.mumbaipolice.org व comcell.mum.crime@ mahapolice. gov.in या वेबसाईटवर online तक्रार करता येते.
- महिलांवरील बलात्कार, विनयभंग, छेडछाड, ॲसिड हल्ला या अत्याचाराच्या गुन्हयामधील आरोपींना जास्तीत जास्त शिक्षा होण्याच्या दृष्टीने प्रचलित कायदयात सुधारणा करुन शासनाने फौजदारी कायदा (सुधारणा) अधिनियम, २०१३ (२०१३ चा अधिनियम क्र.१३ पारित केला आहे.)
- Criminal Law Amendment No.२ of २०१८ नुसार बलात्कारांच्या गुन्हयांच्या शिक्षेत केलेली वाढ व तपासाबाबतच्या नवीन सुधारणांबाबतच्या सूचना दिनांक ०९/०७/२०१८ रोजीच्या परिपत्रकाद्वारे देण्यात आलेल्या आहेत.
- माहिती व तंत्रज्ञान क्षेत्रातील महिलांच्या सुरक्षेच्या उपाययोजना सुचविण्यासाठी दिनांक २७/०७/२०१७ च्या शासन निर्णयानुसार समिती गठीत करण्यात आली आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यासह यवतमाळ जिल्हयातील १९९१ च्या लोकसंख्येच्या आधारीत प्राथमिक आरोग्य केंद्रे सुरु करण्याबाबत

**(१३) ३२११४ (१८-०८-२०१७). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.आनंद ठाकूर, श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यासह यवतमाळ जिल्हयातील १९९१ च्या लोकसंख्येच्या आधारीत सन १९९७ मध्ये मान्यता दिल्याप्रमाणे आरोग्य केंद्रे कार्यान्वित झाली नसल्याचे माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन मान्यताप्राप्त आरोग्य केंद्रे उभारण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (१२-०३-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे.

सन १९९१ च्या लोकसंख्येवर आधारीत बृहत आराखड्यानुसार दिनांक २६/१२/१९९७ च्या शासन निर्णयान्वये प्राथमिक आरोग्य केंद्र हिवरी, कोठा, पाटण, ब्राम्हणगाव, लोहारा, करंजी व खैरगाव यांची स्थाननिश्चिती करण्यात आली होती. त्यापैकी हिवरी व खैरगाव ही प्राथमिक आरोग्य केंद्रे सुरु झाली आहेत.

(२) प्राथमिक आरोग्य केंद्र कोठा व ब्राम्हणगाव यांची बांधकामे पूर्ण झाली असून पदनिर्मितीची कार्यवाही सुरु आहे. प्राथमिक आरोग्य केंद्र लोहारा नागरी क्षेत्रात गेल्यामुळे तेथे मंजूर झालेले प्राथमिक आरोग्य केंद्र कार्यान्वित होऊ शकले नाही. प्राथमिक आरोग्य केंद्र पाटण येथे जागा प्राप्त झाली असून बांधकामाबाबतच्या कार्यवाहीबाबत अंदाजपत्रक सादर करण्याची कार्यवाही सुरू आहे. प्राथमिक आरोग्य केंद्र, करंजीचे स्थलांतरण मौजे वाई येथे करण्यास दिनांक १७/०१/२०१३ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी करण्यात आले असून त्याकरीता अद्याप जागा प्राप्त झालेली नाही. यास्तव ते करंजी येथे कार्यरत आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## ऊर्जा विभागातील मुख्यालयी न राहणाऱ्या अभियंत्यांवर कारवाई करण्याबाबत

**(१४) ३३३१५ (१८-०८-२०१७). श्री.रामराव वडकुते :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील शेतकरी तसेच वीज ग्राहकांना अडचणी येऊ नयेत तसेच वेळेत सेवा मिळावी यासाठी अभियंत्यांनी मुख्यालयी राहणे बंधनकारक असताना हिंगोली शहरातील अभियंते मुख्यालयी राहत नसल्याने तेथील शेतकरी व वीज ग्राहकांनी मा.ऊर्जा मंत्री हे माहे जून, २०१७ मध्ये दौऱ्यावर असताना त्यांच्याकडे तक्रारी केल्या आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, त्यानुषंगाने संबंधित अभियंत्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (१५-०३-२०१९) :** (१) हे खरे आहे.
(२) चौकशी करण्यात येऊन मुख्यालयी राहात नसलेल्या ग्रामीण भागातील महावितरणच्या तीन अभियंत्यावर शिस्तभंगाची कारवाई करण्यात आली आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मराठवाडा विभागातील सर्व जिल्हा परिषद शिक्षकांच्या आंतरजिल्हा बदल्यांची प्रकरणे प्रलंबित असल्याबाबत

**(१५) ३३६१७ (११-०८-२०१७). श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मराठवाडा विभागातील सर्व जिल्हापरिषदांकडे जिल्हा परिषद शिक्षकांच्या आंतरजिल्हा बदल्यांची माहे एप्रिल, २०१७ अखेर जिल्हानिहाय किती प्रकरणे मंजूरी अभावी प्रलंबित आहेत,
(२) असल्यास, आंतरजिल्हा बदल्यांची प्रकरणे प्रलंबित असण्याची कारणे काय आहेत,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन बदल्यांची प्रकरणे मंजूर करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१५-०३-२०१९) :** (१), (२) व (३) राज्यातील जिल्हा परिषद शिक्षकांच्या आंतरजिल्हा बदलीसाठी शासन निर्णय, दिनांक २४/४/२०१७ अन्वये सुधारित धोरण निश्चित करण्यात आलेले आहे. या धोरणानुसार जिल्हा परिषद शिक्षकांच्या आंतरजिल्हा बदल्या ऑनलाईन संगणकीय प्रणालीद्‌वारे करण्यात येत असून, जिल्हा परिषद शिक्षकास आंतरजिल्हा बदली हवी असल्यास अशा शिक्षकांनी ऑनलाईन अर्ज सादर करणे आवश्यक आहे. या प्रणालीच्या

माध्यमातून सन २०१७ मध्ये राज्यात जवळपास ५००० जिल्हा परिषद शिक्षकांच्या आंतरजिल्हा बदल्या करण्यात आल्या असून सन २०१८ मध्ये दुसऱ्या टप्प्यात जवळपास ३००० शिक्षकांच्या आंतरजिल्हा बदल्या करण्यात आलेल्या आहेत. यास्तव जिल्हा परिषद शिक्षकांच्या आंतरजिल्हा बदल्यांची प्रकरणे प्रलंबित राहण्याचा प्रश्न उद्‌भवत नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील दिव्यांग शाळांमधीत शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना सेवाशर्ती नियमावली कायदा लागू करण्याबाबत

**(१६) ३३७३४ (१८-०८-२०१७). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील दिव्यांग शाळांमधील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना सेवाशर्ती नियमावली कायदा लागू करण्याबाबत नागपूर विभागातील लोकप्रतिनिधींनी पत्र क्रमांक ११३८७/२०१७, दिनांक १७ मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास शासनास निवेदन दिले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास या प्रकरणी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (१४-०३-२०१९) :** (१) होय.
(२) अपंग शाळा संहिता १९९७ व २०१८ मध्ये सेवाशर्ती नियमावली दिलेली आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नांदेड येथील शिक्षक सहकारी पतपेढीला जिल्हा मध्यवर्ती बँकेने नियमबाहयरित्या कर्ज दिल्याबाबत

**(१७) ३४४३० (१८-०८-२०१७). श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नांदेड येथील शिक्षक सहकारी पतपेढीला टी.व्ही व फ्रीज खरेदी करण्याच्या नावाखाली जिल्हा मध्यवर्ती बँकेने सन २००० मध्ये दीड कोटी रुपयांचे नियमबाहय कर्ज दिले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, यासंदर्भात शासनाने उच्चस्तरीय चौकशी करुन संबंधित दोषींवर कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (१२-०३-२०१९) :** (१) होय.

(२) जिल्हा विशेष लेखापरिक्षकांच्या दिनांक १९/०३/२००१ च्या अहवालातउक्त गैरव्यवहारामुळे संस्थेचे नम्रता ट्रेडर्स, पुणे यांच्याकडे रुपये १४२.५८ लाख अनावश्यक अडकून पडल्याचे व त्या रकमेवरील व्याजाचा भार संस्थेवर पडल्याचे निदर्शनास आणून दिले व त्यानुषंगाने जिल्हा उपनिबंधकांनी चौकशी अधिकारी नियुक्त करून महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० च्या कलम ८८(१) नुसार चौकशी केली. चौकशी अधिकारी यांनी संस्थेच्या ४ माजी संचालकांवर जबाबदारी निश्चित करून त्यांच्याकडून प्रत्येकी रुपये ८४,१२,७०२.२५ एवढी रक्कम व्याजासह वसूल करण्याबाबत आदेश पारीत केले व दिनांक ०१/०७/२००९ अन्वये तसे संस्थेला सूचित करण्यात आले.

श्री.नारायण गुणाजी कदम व इतर यांनी विभागीय सहनिबंधक सहकारी संस्था, लातूर यांच्याकडे अपील केले असता विभागीय सहनिबंधकांनी दिनांक २१/०६/२०११ च्या आदेशान्वये प्राधिकृत अधिकारी यांचे दिनांक ०१/०७/२००९ चे आदेश कायम केले.

दरम्यान मा.सहकार न्यायालयात दाखल दावा क्र.सीसीएन १०९/२००१ मध्ये मा.सहकार न्यायालयाने दिनांक ०८/११/२०१० च्या आदेशान्वये सदर कर्ज रक्कम बेकायदेशीर असून ती परत करण्याचे संस्थेवर बंधन नसल्याचे निष्कर्ष नोंदवून सदर रक्कम वसूलीस नांदेड जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेस निर्बंध

घातले. या आदेशाविरूध्द नांदेड जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेने सहकार अपील न्यायालय, औरंगाबाद यांच्यासमोर दाखल केलेले अपील क्र.९६/११ व ३२/१२, दिनांक १४/१०/२०१३ रोजी खारीज केले आहेत.

श्री.नारायण गुणाजी कदम व इतर ३ यांनी तत्कालीन मा.मंत्री (सहकार) यांच्यासमोर विभागीय सहनिबंधकांच्या दिनांक २१/०६/२०११ च्या आदेशाविरूध्द पुनर्निरीक्षण अर्ज केला होता.सदर पुनर्निरीक्षण अर्जप्रकरणी कर्जमंजूरी व वाटपात अनियमितता झाल्याचे व सहकार न्यायालयाच्या निर्णयानुसार संस्था व अर्जदार यांच्याकडून वसूली करता येणार नसल्याचे व सदर कर्जाबाबतची जबाबदारी प्रामुख्याने संस्थेचे पदाधिकारी व अधिकारी यांची असल्याचा निष्कर्ष नमूद करून बँकेच्या निबंधकाने कलम ८८ नुसार किंवा अन्य आवश्यक कार्यवाही करण्याचे आदेश पारीत केले आहेत.

नांदेड जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेच्या सन २०००-२००१ व २००१-२००२ लेखापरिक्षण व फेरलेखापरिक्षण अहवालात बँकेस सुमारे १५०.०० लाख रकमेच्या झालेल्या नुकसानाबाबत तसेच अन्य अशा एकूण १२ मुद्यांबाबत चौकशी करण्यासाठी महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० च्या कलम ८८ नुसार श्री.ए.एस.गंभीरे, जिल्हा विशेष लेखापरिक्षक वर्ग-१ सहकारी संस्था, लातूर यांची दिनांक १९/०१/२००९ च्या आदेशान्वये चौकशी अधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात आली. चौकशीचा दिनांक २६/०४/२०११ रोजी सादर केलेला अहवाल परिपूर्ण नसून चौकशीची रितसर कार्यवाही केली नसल्याने ही कृती कर्तव्यात कसूर करणारी असल्याचे सहकार आयुक्तालयास कळविण्यात आले होते. तथापि, तद्नंतर श्री.बळवंत बबन पवार प्राधिकृत अधिकारी यांनी पुनरीक्षण अर्ज (क्र.६३१/२०११) दाखल केला होता.दिनांक ०४/११/२०१५ रोजी आदेश पारीत झाले असून दिनांक २८/०४/२०११ रोजी सादर केलेला चौकशी अहवाल कायम करण्यात आला आहे. कार्यवाही पूर्ण झाली असून आता या प्रकरणी श्री.ए.एस.गंभीरे, चौकशी अधिकारी यांचेविरूध्द कार्यवाही करण्याची आवश्यकता राहिलेली नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## अपंगांच्या प्रलंबित मागण्याबाबत

**(१८) ३५२५८ (०२-०१-२०१८). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अपंगांच्या विविध मागण्यांबाबत दिनांक ५ एप्रिल, २०१७ रोजी मा.मंत्री सामाजिक न्याय विभाग यांच्या अध्यक्षतेखाली मुंबई येथे आयोजित करण्यात आलेल्या बैठकीत अपंगांच्या प्रलंबित १० मागण्यांबाबत चर्चा होऊन निर्णय घेण्यात आले व या निर्णयानुसार कार्यवाही करण्याचे निर्देश मा.मंत्री महोदयांनी आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांना दिले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त निर्देशानुसार दिनांक २ जून, २०१७ रोजी आयुक्त, अपंग कल्याण यांना बैठकीचे इतिवृत्त पाठवून तसेच नागपूर विभागाच्या लोकप्रतिनिधींनी दिनांक ७ सप्टेंबर, २०१७ रोजी शासनास पत्र पाठवून कार्यवाही करण्याचे निर्देश देऊनही अंमलबजावणी करण्यात आली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने आयुक्त, अपंग कल्याण यांचेविरूध्द कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (१५-०३-२०१९) :** (१) होय.

(२) नाही.

(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अपंग वसतिगृहाच्या अधीक्षकांना आदिवासी आश्रमशाळा व शासकीय वसतिगृह अधीक्षकांप्रमाणे वेतनश्रेणी देण्याबाबत

**(१९) ३५५५१ (०३-०१-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अपंगांच्या अनुदानित विशेष शाळेला संलग्न असलेल्या वसतिगृह अधीक्षकांना आदिवासी आश्रमशाळा व शासकीय वसतिगृह अधीक्षकांप्रमाणे वेतनश्रेणी देण्यासंदर्भात सर्व जिल्ह्यातील समाजकल्याण विभागांतर्गत असलेल्या अपंगांच्या विषेश/कर्मशाळेतील वसतिगृह अधीक्षकांच्या वेतन श्रेणीची आर्थिक भार माहिती शासनाने दिनांक १८ जून, २०१६ रोजीच्या पत्रानुसार मागविली होती, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, याबाबत सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकाऱ्यांनी दिलेली माहिती अपंग कल्याण आयुक्तालयाकडे सादर करुन दिनांक १४ ऑक्टोबर, २०१६ रोजीच्या पत्रान्वये वसतिगृह अधीक्षकांचे वेतनश्रेणीबाबतचे अहवाल १० दिवसात सादर करण्याचे आदेश देण्यात आले होते, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, अहवाल सादर करण्यात आले नसल्याने नागपूर विभागाच्या लोकप्रतिनिधींनी दिनांक ५ डिसेंबर, २०१६ व दिनांक ७ डिसेंबर, २०१७ रोजी शासनास पत्राद्वारे वसतिगृह अधीक्षकांच्या वेतनश्रेणीचा प्रश्न त्वरीत निकाली काढण्याची विनंती केली होती, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, याप्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (१६-०३-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे.

अपंगाच्या विशेष/कर्मशाळेतील वसतिगृह अधीक्षकांच्या वेतनश्रेणीच्या आर्थिक भाराबाबतची माहिती शासनपत्र दिनांक १५/०१/२०१५ अन्वये मागविण्यात आलेली माहिती आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांच्याकडून दिनांक १८/०६/२०१६ रोजी शासनास प्राप्त झाली आहे.

(२) व (३) होय.

(४) सदर प्रकरणी शासनस्तरावर कार्यवाही सुरु आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात जवाहर रोजगार योजनेंतर्गत विहीरींची कामे करण्याबाबत

**(२०) ३६००३ (०२-०१-२०१८). श्री.आनंदराव पाटील :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात जवाहर रोजगार योजनेतून विहीर खोदण्यासाठी ६० आर क्षेत्राची अट रद्द करुन १ ते २ आर क्षेत्रास परवानगी द्यावी, दोन्ही विहिरीचे अंतर ५०० फूटाची अट रद्द करावी तसेच मास्टर व जॉब कार्ड बंद करुन शाखा अभियंता यांना मोजमाप करुन शेतक-यांच्या नावे बिल द्यावे इत्यादी मागणी लोकप्रतिनिधी व शेतकरी यांनी संबंधिताकडे करुनही अद्यापी कोणतीही कार्यवाही करण्यात आली नसल्याचे माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त मागण्यांच्या अनुषंगाने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. जयकुमार रावल (२९-०५-२०१९) :** (१) होय, हे अंशत: खरे आहे.

जवाहर रोजगार हमी योजना ही यापूर्वीच बंद झाली असून या योजनेतून सद्यस्थितीत कोणत्याही प्रकारची कामे घेतली जात नाहीत. महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेअंतर्गत विहिरींची कामे घेतली जातात. सदर विहीरींची कामे विहित नियमानुसार होत असून, जॉबकार्ड व मस्टर संदर्भात देखील ठरवून दिलेल्या निकषानुसार कार्यवाही होत आहे.

(२) महाराष्ट्र भूजल (विकास व व्यवस्थापन) अधिनियम, २००९ मधील कलम २१ अन्वये, सार्वजनिक पिण्याच्या पाण्याच्या स्त्रोताच्या ५०० मीटरच्या अंतरामध्ये विहिर खोदण्यास प्रतिबंध करण्यात आलेला असून इतर परिसरामध्ये सिंचन विहिर करतांना दोन सिंचन विहिरींमधील किमान अंतर १५० मीटर असावे आणि भुजल पातळी खालावत असल्यामुळे १५० मीटर हे अंतर कमी करणे योग्य नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नरडाणा (ता.शिंदखेडा, जि.धुळे) येथील शेतकऱ्यांना जमिनीचा योग्य मोबदला देण्याबाबत

**(२१) ३६०३६ (०३-०१-२०१८). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **उद्योग मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नरडाणा औद्योगिक वसाहत (ता.शिंदखेडा, जि.धुळे) येथील महाराष्ट्र राज्य औद्योगिक विकास महामंडळाने मौजे गोराणे, मेलाणे, माळीच, जातोडा व वारूड मधील ६६७.२१ हे.आर. एवढे क्षेत्र महाराष्ट्र औद्योगिक विकास अधिनियम १९६१ अन्वये प्रकरण ६ ची अधिसूचना दिनांक ४ नोव्हेंबर, २०१० रोजी प्रसिध्द केली असून सदर भुसंपादित जमिनीचे नुकसान भरपाई दर निश्चित करण्याकरीता कलम ३३२ अन्वये जिल्हाधिकारी, धुळे यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २४ ऑक्टोबर, २०१३ व दिनांक ११ मार्च, २०१६ रोजी आयोजित केलेल्या बैठकीत प्रतिहेक्टरी रूपये २० लक्ष मोबदला देण्याचे जाहीर करण्यात आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शेतकरी रूपये ५० लक्ष प्रतिहेक्टरी दर देण्याची मागणी करत असून नविन खरेदी विक्री तक्त्यानुसार प्रतिहेक्टरी रूपये ३८,१५,१८४/- इतका दर देण्याचा प्रस्ताव महामंडळाने शासनाकडे सादर केला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, २०० शेतकऱ्यांनी रूपये २० लक्ष प्रतिहेक्टरी हरकती ठेऊन जमीन महामंडळास देण्यास दिनांक २५ जून, २०१७ रोजी संमतीपत्र महामंडळास दिले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देसाई (२८-०२-२०१९) :** (१) होय.

(२) व (३) महामंडळाने शासनास प्रस्ताव सादर केला नसून एकूण १४२ शेतकऱ्यांनी सदरच्या जमिनी हरकती ठेऊन भूसंपादन करावे व नवीन भूसंपादन कायद्यानुसार योग्य तो बाजारभावानुसार मोबदला देण्यात यावा अशी मागणी त्यांचे निवेदनान्वये केली आहे.

(४) व (५) भूसंपादन कायदयातील तरतुदींचा अवलंब करून परिगणीत होणारा दर व उच्चाधिकार समितीने मान्यता दिलेला दर प्रति हेक्टरी रुपये २० लाख आहे. तो भूमी संपादन, पुनर्वसन व पुनर्वसाहत करताना उचित भरपाई मिळण्याचा आणि पारदर्शकतेचा हक्क अधिनियम २०१३ प्रमाणे देय मोबदल्याहून जास्त आहे. दिनांक १२/७/२०१८ रोजी जिल्हाधिकारी, धुळे यांचे अध्यक्षतेखाली बैठक झाली असून खातेदारांची हेक्टरी ५० लक्ष इतकी मागणी अवाजवी आहे. यासंदर्भात पुढील निर्णय घेण्याबाबतची महामंडळस्तरावर कार्यवाही सुरू आहे.

---

## कळवणे, नाशिक, राजूर, तळोदा, नंदुरबार व यावल (जि.नाशिक) येथील कन्यादान प्रकल्पात गैरव्यवहार झाल्याबाबत

**(२२) ३६९६६ (०२-०१-२०१८). श्री.अनिल भोसले** : सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कळवणे, नाशिक, राजूर, तळोदा, नंदुरबार व यावल (जि.नाशिक) या सहा आदिवासी कन्यादान प्रकल्पांतर्गत झालेल्या रुपये ३७ कोटी गैरव्यवहाराची सुरु असलेली चौकशी पूर्ण झाली आहे काय,

(२) असल्यास, यात दोषी आढळून आलेल्यांवर शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (२२-०३-२०१९) :** (१) व (२) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास, नाशिक यांच्या कार्यक्षेत्रामध्ये सन २०११ मध्ये कन्यादान योजनेंतर्गत अपहार झाल्याचे प्रथमदर्शनी निदर्शनास आल्याने सदर प्रकरणी सरकारवाडा पोलीस स्टेशन, नाशिक येथे एफ.आय.आर. क्रमांक ६९६/१० दिनांक १३/१२/२०१० रोजी दाखल केलेला असून क्रमांक आर.सी.नंबर २६३/२०१२ हे प्रकरण न्याय प्रविष्ट आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

# अहमदनगर जिल्हा परिषद अंतर्गत शिक्षण सेवक पदासाठी नियुक्ती करण्याबाबत

**(२३) ३७५९६ (१४-१२-२०१७). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अहमदनगर जिल्हा परिषद अंतर्गत सन २००८-०९ मध्ये शिक्षण सेवक पदासाठी ३६० प्रकल्पग्रस्त उमेदवारांची निवड करण्यात आली असून सदर प्रकल्पग्रस्त उमेदवारांपैकी ३२५ प्रकल्पग्रस्तांना नियुक्ती देण्यात आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, प्रकल्पग्रस्त प्रमाणपत्राच्या वैधतेमुळे काही शिक्षण सेवकांना नियुक्ती देण्यात आली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, पुनर्वसन अधिकारी यांनी प्रकल्पग्रस्त प्रमाणपत्र वैध असल्याचे अहवाल शासनास देऊनही संबंधित प्रकल्पग्रस्त उमेदवारांना नियुक्ती देण्यात आली नाही तसेच उर्वरित शिक्षण सेवकांपैकी काहींना नियुक्तीचे आदेश देऊनही त्यांना सेवेत सामावून घेतले नाही, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, याप्रकरणी प्रशासनाच्या दिरंगाईमुळे संबंधित प्रकल्पग्रस्त उमेदवारांना नियुक्ती मिळत नाही, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने प्रकल्पग्रस्त शिक्षणसेवकांना नियुक्ती मिळणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१५-०३-२०१९) :** (१) अंशत: खरे आहे. अहमदनगर जिल्हा परिषदेने प्रकल्पग्रस्त व भूकंपगस्त प्रवर्गामधून २२१ उमेदवारांना शिक्षणसेवक पदावर नियुक्या देण्यात आलेल्या आहेत.

(२) होय, हे खरे आहे.

(३) अंशत: खरे आहे. सदर प्रकल्पग्रस्त प्रमाणपत्र वैध असल्याबाबत अहवाल दिनांक ०९/१२/२००९ अन्वये प्राप्त झाला. तथापि, त्यापूर्वी शासन निर्णय बदलल्याने ४५ उमेदवारांना शासन निर्णय, दिनांक २७ ऑक्टोबर २००९ नुसार मा.उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपीठाच्या निर्णयानुसार व शासन

निर्णयानुसार नियुक्त्या जाहिरातीशिवाय व त्यांची सेवा प्रवेश गुणवत्ता डावलून करता येणार नसल्यामुळे नियुक्त्या देण्यात आलेल्या नाहीत.
(४) हे खरे नाही.
(५) नाही.
(६) प्रश्न उद्भवत नाही.

---

## आदिवासी आश्रमशाळांमधील गृहपालांची रिक्त पदे भरण्याबाबत

**(२४) ३८२९२ (०३-०४-२०१८). श्री.आनंदराव पाटील, श्री.सुभाष झांबड, श्री.शरद रणपिसे, श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात आदिवासी विभागांतर्गत चालविण्यात येणाऱ्या मुला-मुलींच्या निवासी आश्रमशाळेतील अधिक्षक (पुरूष/महिला) संवर्गाची १०४ पदे तसेच वसतिगृहातील गृहपाल संवर्गातील ६८ पदे रिक्त आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, आश्रमशाळांमधील गृहपाल संवर्गातील रिक्त पदे पदोन्नतीने भरण्याबाबतची कार्यवाही सुरु आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर कार्यवाहीचा तपशील काय आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (०७-०३-२०१९) :** (१) होय, अधीक्षक संवर्गातील डिसेंबर, २०१८ अखेर २४० पदे व गृहपाल संवर्गातील ८५ पदे रिक्त आहेत.
(२) होय.
(३) अपर आयुक्त, नाशिक व नागपूर यांच्याकडील पदोन्नतीची कार्यवाही पूर्ण करण्यात आली आहे. अपर आयुक्त, ठाणे व अमरावती यांच्याकडील पदोन्नतीची कार्यवाही सुरू आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील इतर मागासवर्गीयांच्या शिष्यवृत्ती, आरक्षण तसेच समाजाच्या विकासासाठी कार्यवाही करण्याबाबत

**(२५) ३८३४९ (०४-०४-२०१८). श्री.हरिसिंग राठोड :** सन्माननीय **विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) इतर मागासवर्गीयांच्या समस्या सोडविण्यासाठी शासनाने माहे डिसेंबर, २०१६ मध्ये ओबीसी मंत्रालयाची स्थापना करुनही चंद्रपूर व गडचिरोली जिल्ह्यात कमी करण्यात आलेले ओबीसींचे आरक्षण पूर्ववत झालेले नाही तसेच मागील २ वर्षापासून ओबीसी विद्यार्थ्यांना उच्च शिक्षण विभागाची शिष्यवृत्ती मिळाली नसल्याचे माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) तसेच राज्यात अनेक जिल्ह्यांमध्ये ओबीसी प्रवर्गात असलेल्या जातींना वेगवेगळे आरक्षण देण्यात आले आहे काय तसेच चंद्रपूर व गडचिरोली जिल्ह्यात ओबीसी समाज मोठ्या प्रमाणात असताना याच विभागात ओबीसीचे आरक्षणाचे टक्केवारी कमी करण्याची कारणे काय आहेत,

(३) असल्यास, शिष्यवृत्ती व आरक्षणाबाबत तसेच समाजाच्या विकासासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (१२-०३-२०१९) :** (१), (२) व (३) दिनांक ०१/०४/२०१७ पासून विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागासप्रवर्ग विभाग हा नव्याने निर्माण केला आहे हा विभाग सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागातून वेगळा करण्यात आलेला आहे.

या विभागामार्फत विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागासप्रवर्ग यांना शासनाने निश्चित केलेल्या आरक्षण धोरणानुसार कार्यवाही करण्यात येत आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील कातकरी समाजाच्या मागण्यांबाबत

**(२६) ३८६०० (०३-०४-२०१८). श्री.जनार्दन चांदूरकर, श्री.शरद रणपिसे, श्री.आनंदराव पाटील :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील कातकरी समाजाच्या आर्थिक, सामाजिक व शैक्षणिक विकासासाठी आराखडा तयार करण्यात आला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर आराखड्यानुसार कातकरी समाजाच्या सर्वांगिण विकासासाठी कोणत्या उपाययोजना करण्यात आल्या वा येत आहेत,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (११-०३-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे, केंद्र शासनाने आदिम जमाती सदंर्भात जाहीर केलेल्या विकास कार्यक्रमामध्ये कातकरी जमातीचा समावेश असून त्यांच्या आर्थिक, सामाजिक व शैक्षणिक विकासासाठी आराखडा तयार करण्यात आला आहे.

(२) व (३) सन २०१८-१९ या वर्षात आदिम जमाती संरक्षण तथा विकास कार्यक्रमांतर्गत आदिम जमातीसाठी शिक्षण/आरोग्य/कृषी/उत्पन्नवाढ या घटकांतर्गत योजनांचा रुपये १२४०.०० लक्ष इतक्या रकमेचा प्रारुप आराखडा तयार करुन केंद्र शासनास मान्यतेस्तव सादर करण्यात आलेला होता. त्यानुषंगाने केंद्र शासनाने रुपये १२३०.२६ लक्ष इतक्या आराखड्यास मंजूरी दिलेली आहे. सदर निधी दिनांक १०/१/२०१९ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात शिक्षण संस्थामध्ये विद्यार्थांच्या शिष्यवृत्ती वाटपात गैरव्यवहार झालेल्याबाबत

**(२७) ३८९१३ (०६-०४-२०१८). श्री.गिरीशचंद्र व्यास, प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात अनेक शिक्षण संस्थामध्ये बनावट विद्यार्थांच्या नावाने लाखो रूपयाची शिष्यवृत्ती लाटण्याचा प्रकार संस्थांचालककाकडून व अधिकाऱ्यांकडून होवूनही फक्त तीन संस्थाचालकांना अटक करून गुन्हे दाखल केल्याचे दिनांक २७ डिसेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन शिष्यवृत्ती गैरव्यवहारातील उर्वरीत दोषी संस्थाचालक व अधिकाऱ्यांवर कारवाई करण्यासाठी काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (१३-०३-२०१९) :** (१) अंशत: खरे आहे.
(२) विशेष चौकशी पथकाने शिफारस केलेल्या व शासनाने गुन्हे दाखल करण्याबाबत कळविलेल्या ७० संस्थांपैकी ४ संस्थांविरुध्द गुन्हे दाखल करण्यात आले आहेत, उर्वरीत ४० शैक्षणिक संस्थांनी त्यांच्याविरुध्द कारवाई विरोधात न्यायालयात याचिका दाखल केलेल्या आहेत, तर २ संस्था आदिवासी विकास विभागाशी संबंधित असून, उर्वरित २४ संस्थांविरुध्द गुन्हे दाखल करण्याबाबत आयुक्तालयामार्फत संबंधित सहायक आयुक्त, समाज कल्याण यांना कळविण्यात आलेले आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कौशल्य विकास विभागाने अभ्यासक्रमात बदल करण्याबाबत

**(२८) ३९१२६ (०६-०४-२०१८). श्री.चंद्रकांत रघुवंशी :** सन्माननीय **कौशल्य विकास व उद्योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कौशल्य विकास विभागाने शिक्षणासोबतच वेगवेगळे कौशल्य विकास अभ्यासक्रम सुरु केले असून इयत्ता आठवी ते बारावीच्या विद्यार्थ्यांना छोटेखानी अभ्यासक्रम या माध्यमातून शालेय शिक्षणात शिकविण्यात येतात, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, परंतु इयत्ता बारावी नंतर या अभ्यासक्रमाची मदत घेऊन रोजगार उपलब्ध होण्याची संधी मिळत नसल्याने विद्यार्थी पुन्हा पारंपारिक अभ्यासक्रमाकडे वळत आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, कौशल्य विकास शिक्षण ही आजची गरजच असून यासंदर्भातील अभ्यासक्रम बाजारातील मागणी लक्षात घेऊन तयार व्हायला हवेत तसेच त्यात वेळोवेळी बदल करण्यात यावे अशी मागणी शिक्षणक्षेत्रातील मान्यवरांनी केली आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त बाबीची दखल घेऊन सध्या बाजारातील मागणीनुसार मनुष्यबळाचा पुरवठा होण्यासाठी कौशल्य विकास विभागाकडून छोटेखानी अभ्यासक्रमात बदल करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (२८-०३-२०१९) :** (१) कौशल्य विकास व उद्योजकता विभागामार्फत व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयांतर्गत शालेय शिक्षणात इ. ९ वी व इ. १० वी स्तरावर पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रम, इ. ११ वी व इ. १२ वी स्तरावर उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रम तसेच व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम राबविले जातात.

(२) अंशत: खरे आहे.

उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रमाचे विद्यार्थी रोजगार व स्वयंरोजगाराकडे वळतात. मात्र व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमाचे विद्यार्थी मोठ्या प्रमाणात उच्च शिक्षणाकडे वळतात.

(३) होय, हे खरे आहे.

(४) राज्यातील व्यवसाय शिक्षण घेणाऱ्या जास्तीत जास्त विद्यार्थ्यांना औद्योगिक क्षेत्राच्या गरजेनुसार आधुनिक तंत्रज्ञानानुसार होणारे बदल लक्षात घेवून उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचा शासन निर्णय, दिनांक ४/७/२०१५ अन्वये माध्यमिक स्तरावरील पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रमात बदल करण्यात आले आहेत. उच्च व तंत्र शिक्षण विभाग शासन निर्णय, दिनांक २७/३/२०१४ अन्वये उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रम पुनर्रचित करुन नविन सुधारित अभ्यासक्रम सन २०१४-१५ पासून लागू करण्यात आले आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

___________

## राज्यात ग्रामीण भागातील रस्त्यांकरीता निधी देण्याबाबत

**(२९) ४१५२१ (१४-०८-२०१८). श्री.गोपिकिशन बाजोरीया :** सन्माननीय **नियोजन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील जिल्हा नियोजन समितीच्या निधीमधून ग्रामीण भागातील रस्त्यांकरीता अत्यंत कमी प्रमाणात निधीचे नियोजन करण्यात येते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, अमरावती विभागातील अकोला, वाशिम व बुलढाणा जिल्ह्याकरीता मागील चार वर्षामध्ये ग्रामीण रस्त्यांकरीता अत्यंत कमी निधी देण्यात आला, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन ग्रामीण भागातील रस्त्यांकरीता भरीव निधी उपलब्ध करुन देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (१५-०३-२०१९) :** (१) नाही.

सन २०१५-१६ ते सन २०१८-१९ या ४ वर्षात ग्रामीण भागातील रस्त्यांकरीता खालीलप्रमाणे तरतूद करण्यात आली आहे.

(रुपये लाखात)

| **जिल्हे** | **२०१५-१६** | **२०१६-१७** | **२०१७-१८** | **२०१८-१९** |
|---|---|---|---|---|
| अकोला | ७१७.२१ | ९१७.२१ | १८९.१८ | ६००.०० |
| बुलढाणा | १४००.०० | २४००.०० | ९१०.०० | १०००.०० |
| वाशिम | ९४५.०९ | ७१३.९५ | २२३.६७ | १५०.०० |

(२) नाही.

जिल्हा नियोजन समिती, अकोला, वाशिम व बुलढाणा यांच्या मान्यतेने ग्रामीण रस्त्यांकरीता नियतव्यय निश्चित करण्यात आलेला आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

## बीड जिल्हयात अतिवृष्टीमुळे क्षतिग्रस्त व फुटलेल्या पाझर तलावांच्या दुरुस्तीबाबत

**(३०) ४१७२१ (०१-०८-२०१८). श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) बीड जिल्हयात माहे सप्टेंबर ते नोव्हेंबर, २०१६ या कालावधीत झालेल्या अतिवृष्टीमुळे जिल्हयातील २६४ विविध सिंचन प्रकल्प क्षतिग्रस्त झाले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, क्षतिग्रस्त सिंचन प्रकल्पांच्या दुरुस्तीसाठी सन २०१८-१९ जिल्हा वार्षिक योजनेतून संबंधित कार्यकारी अभियंत्यांनी केलेल्या मागणीनुसार निधीची उपलब्धता झाली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, दोन वर्षाहून अधिक काळ क्षतिग्रस्त असलेल्या सिंचन प्रकल्पांच्या दुरुस्तीसाठी शासनाने निधी उपलब्ध करुन दिला आहे, तसेच मौजे अर्धमसला (ता.गेवराई) येथील क्षतिग्रस्त पाझर तलावाच्या दुरुस्तीचे काम कोणत्या यंत्रणेकडून केले जाणार आहे,
(४) असल्यास, जिल्हयातील २६४ क्षतिग्रस्त सिंचन प्रकल्पापैकी किती प्रकल्पांची दुरुस्तीची कामे पूर्ण झाली आहेत व उर्वरित कामाचे कोणते नियोजन केले आहे तसेच रुपये १७७९.७९ लक्ष निधीच्या उपलब्धतेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (१४-०३-२०१९) :** (१) हे खरे आहे.
(२) हे खरे नाही.
(३) व (४) बीड जिल्हयात माहे सप्टेंबर, २०१६ या महिण्यात झालेल्या अतिवृष्टीमुळे २६४ पाझर तलाव, गाव तलाव, सिंचन तलाव, सिमेंट नाला बांध व को.प. बंधारे क्षतिग्रस्त झाले असून तलावांची दुरुस्तीची ३ कामे जलयुक्त शिवार अभियान अंतर्गत आणि ८७ कामे विविध लेखाशिर्षामधील उपलब्ध निधीतून पूर्ण करण्यात आली आहेत. उर्वरित अपूर्ण कामांपैकी ८ कामांना तांत्रिक मान्यता प्रदान करण्यात आली आहे. तसेच ५७ कामे सन २०१८-१९ मध्ये आणि १०९ कामे सन २०१९-२० मध्ये निधी उपलब्धतेनुसार पूर्ण करण्याचे नियोजन आहे.

मौजे अर्धमसला (ता.गेवराई) येथील क्षतिग्रस्त पाझर तलाव मृद व जलसंधारण विभागांतर्गत येत नाही, तथापि, सदर क्षतिग्रस्त पाझर तलावाचे दुरुस्तीचे काम "० ते १०० हेक्टर क्षमतेपर्यंतचे लघुपाटबंधारे बंधाऱ्याचे बांधकाम व दुरुस्ती" या जिल्हास्तरीय योजनेमधुन (DPDC) करण्याबाबत जिल्हाधिकारी, बीड यांना दिनांक २० फेब्रुवारी, २०१९ च्या पत्रान्वये सूचना देण्यात आल्या आहेत.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## औरंगाबाद विभागातील वि.जा.भ.ज. आश्रमशाळेतील कर्मचाऱ्यांच्या प्रलंबित मागण्याबाबत

**(३१) ४१८४४ (०१-०८-२०१८). श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) औरंगाबाद विभागातील मान्यता प्राप्त अनुदानित वि.जा.भ.ज. आश्रम शाळेतील कर्मचाऱ्यांचे अनेक वर्षापासून वरिष्ठ वेतन श्रेणी, कालबध्द पदोन्नती सेवाखंड मान्यता प्रस्ताव प्रलंबित आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी त्वरीत निर्णय घ्यावा म्हणुन मा.उच्च न्यायालयाने आदेश देऊनही यावर कोणतीही कार्यवाही होत नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने प्रलंबित प्रकरणे निकाली काढण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (२०-०३-२०१९) :** (१), (२), (३) व (४) विमुक्त जाती, भटक्या जमातीच्या आश्रमशाळांतील कर्मचाऱ्यांना वरिष्ठ वेतनश्रेणी, कालबध्द पदोन्नती देण्याच्या योजनेचा शासन निर्णय नाही. मात्र ज्या प्रकरणात मा.न्यायालयाने निर्देश दिले आहेत अशा प्रकरणात वित्त विभागाच्या मान्यतेनंतर लाभ देण्यात आले आहेत.

---

## अनुदानित आश्रमशाळेच्या कर्मचाऱ्यांना कालबध्द पदोन्नतीचा लाभ देण्याबाबत

**(३२) ४२२९८ (०१-०८-२०१८). डॉ.सुधीर तांबे, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.विक्रम काळे, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्याच्या आदिवासी विकास विभागांतर्गत शासकीय आश्रमशाळेतील वर्ग ४ च्या पदावरील कर्मचाऱ्यांना कालबध्द पदोन्नतीचा लाभ मिळतो, मात्र अनुदानित आश्रमशाळेतील वर्ग ४ च्या पदावरील कर्मचारी या योजनेपासून वंचित आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, अनुदानित आश्रमशाळेतील वर्ग ४ च्या पदावरील कर्मचाऱ्यांना कालबध्द पदोन्नतीचा लाभ देण्याबाबत शासनाने काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (२१-०२-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) अनुदानित आश्रमशाळेतील वर्ग ४ च्या पदावरील कर्मचाऱ्यांना कालबध्द पदोन्नतीचा लाभ देण्याबाबतचा प्रस्ताव वित्त विभागास सादर करण्यात आला असता वित्त विभागाने त्रुटींची पुर्तता करुन प्रस्ताव सादर करण्याचे निर्देश दिले आहेत. सदर त्रुटींच्या अनुषंगाने आवश्यक माहिती आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्याकडून मागविण्यात आली असून त्याबाबत पाठपुरावा सुरु आहे. सदर माहिती प्राप्त होताच प्रस्ताव पुन्हा वित्त विभागास सादर करण्यात येईल.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पुणे जिल्हयातील शिक्षक बदलीविना मागील अनेक वर्षांपासून वंचित असल्याबाबत

**(३३) ४३७४२ (०२-०८-२०१८). श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे जिल्ह्यातील दुर्गम, डोंगराळ, अवघड क्षेत्रात काम करणारे बदली अधिकार पात्र शिक्षक बदलीविना मागील अनेक वर्षांपासून वंचित असल्याचे माहे एप्रिल, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, तद्नूसार खडतर परिस्थितीत वर्षानुवर्षे काम केलेल्या बदली अधिकार पात्र शिक्षकांची सुगम भागात बदली करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१५-०३-२०१९) :** (१) हे खरे आहे.
(२) दिनांक २७ फेब्रुवारी, २०१७ च्या शासन निर्णयानुसार शिक्षक संवर्गाचे बंदल्यांसाठीचे सुधारित बदली धोरण निश्चित करण्यात आले आहे. सदरच्या शासन निर्णयानुसार अवघड, सर्वसाधारण क्षेत्रातील बदलीपात्र शिक्षकांनी संगणकीय प्रणालीद्वारे अर्ज भरण्याची कार्यवाही करण्यात आली होती. तथापि, एप्रिल, २०१८ पर्यंत सदर शिक्षकांच्या बदल्यांची कार्यवाही पूर्ण झालेली नव्हती. जून, २०१८ मध्ये दुर्गम क्षेत्रातील बदली अधिकार पात्र शिक्षकांच्या सेवाज्येष्ठतेनुसार व त्यांनी दिलेल्या पसंतीक्रमानुसार संगणकीय प्रणालीद्वारे बदली प्रक्रिया पूर्ण झालेली आहे. त्यानुसार खडतर परिस्थितीत वर्षानुवर्षे काम केल्याबद्दल बदली अधिकार प्राप्त शिक्षकांच्या बदल्या झालेल्या आहेत व ते पसंतीच्या नवीन शाळेत रुजू झालेले आहेत.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मौजे लिंगडाळ (ता.देवगड, जि.सिंधुदुर्ग) येथे अवैधरित्या सुरु असलेले चिरेखाणीचे काम बंद करण्याबाबत

**(३४) ४३९५२ (०२-०८-२०१८). श्री.रविंद्र फाटक :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मौजे लिंगडाळ (ता.देवगड, जि.सिंधुदुर्ग) येथे अवैधरित्या चिरेखाणीचे काम सुरु असल्याचे माहे जुलै, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर चिरेखाणीतून निघणाऱ्या धुळीच्या व ध्वनी प्रदुषणामुळे परिसर प्रदूषित होऊन आजुबाजुच्या नागरिकांच्या आरोग्यास धोका निर्माण झाला असून सदर परिसरात स्थानिक शेतकऱ्यांची पिके नष्ट होत आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त चिरेखाण बंद करण्याबाबत स्थानिक लोकप्रतिनिधी तसेच स्थानिक नागरिकांनी मा.पर्यावरण मंत्री यांच्याकडे दिनांक ०५ डिसेंबर, २०१६ रोजी पत्रव्यवहार करुनही कोणतीच कार्यवाही झाली नाही, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदरहू चिरेखाण बंद करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२८-०३-२०१९) :** (१) व (२) अशी बाब निदर्शनास आली नाही.
(३) उक्त निवेदन मा.मंत्री (पर्यावरण) यांचे कार्यालयाकडून प्रादेशिक अधिकारी, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ, कोल्हापूर यांचे कार्यालयाकडे कार्यवाहीसाठी पाठविण्यात आले आहे.
(४) मौजे लिंगडाळ (ता.देवगड, जि.सिंधुदुर्ग) हे गाव इको-सेन्सिटीव्ह झोनमध्ये येत असलेने सदर गावात खाण कामास परवानगी नाही. तसेच मौजे लिंगडाळ येथे अवैधरित्या चिरेखाण सुरु असल्याचे निदर्शनास आले नाही.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नागपूर येथे शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था मध्ये १० ट्रेडला मंजुरी असून केवळ २ ट्रेडचा अभ्यासक्रम सुरू असल्याबाबत

**(३५) ४४०८१ (०५-१२-२०१८). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.रामदास आंबटकर, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नागपूर येथे सामाजिक न्याय विभागामार्फत इंदोरा मैदान येथे शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थामध्ये १० ट्रेडला मंजुरी असून केवळ २ ट्रेडचा अभ्यासक्रम सुरू असल्याचे दिनांक १४ सप्टेंबर, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व सदर औद्योगिक प्रशिक्षण संस्थेच्या मंजूर ट्रेड (अभ्यासक्रमाला) शासन मंजूरी देणार आहे काय,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (१३-०३-२०१९) :** (१) अंशत: होय.
(२) नागपूर येथील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थामध्ये १२ व्यवसायांपैकी काही व्यवसाय बंद करुन दिनांक २८/०७/२०१६ च्या शासन निर्णय अन्वये ६ व्यवसायाच्या प्रत्येकी २ तुकड्या अशा एकूण १२ तुकड्या मंजूर करण्यात आल्या आहेत.

सद्य:स्थितीत, कॉम्प्युटर ऑपरेटर ॲण्ड प्रोग्रामिंग असिस्टंट व फॅशन टेक्नॉलॉजी या व्यवसायाच्या प्रत्येकी १ तुकडी अशा एकूण दोन तुकड्यांना संलग्नता प्राप्त आहे. उर्वरीत व्यवसायाच्या तुकड्यांना संलग्नता प्राप्त करणेकरीता डी.जी.ई.टी., नवी दिल्ली च्या मानकानुसार प्रत्येक तुकड्यांसाठी १००% यंत्रसामग्री, साधन सामग्री कार्यशाळेकरीता असणारी आवश्यक जागा, आवश्यक कर्मचारी वर्ग व आवश्यक विद्युत पुरवठा असणे अत्यावश्यक आहे. याची पुर्तता करण्यासाठी वेळोवेळी जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, नागपूर, सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, नागपूर व संचालक, व्यवसाय शिक्षण, संचालनालय, म. रा. मुंबई यांचेकडे पाठपुरावा करण्यात आलेला आहे.

डी.जी.ई.टी., नवी दिल्ली यांनी मागील तीन ते चार वर्षात सर्व व्यवसायांचे अभ्यासक्रमामध्ये वारंवार बदल केल्याने सर्व व्यवसायांच्या यंत्रसामुग्री व साधनसामुग्रीमध्ये त्रुटी निर्माण झालेली आहे. ही यंत्रसामुग्री व साधनसामुग्रीची त्रुटींची पूर्तता १०० टक्के पूर्ण झाल्यानंतर व सर्व व्यवसायांचे डी.जी.ई.टी., नवी दिल्ली यांचेकडून संलग्नता प्राप्त झाल्याबरोबर त्यांचा प्रशिक्षणाकरीता वापर करण्यात येईल.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नागपूर जिल्हा मध्यवर्ती बॅकेच्या कर्मचाऱ्यांना महागाई भत्ता व वार्षिक वेतनवाढ देणे बंद केल्याबाबत

**(३६) ४४१०६ (०५-१२-२०१८). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.रामदास आंबटकर, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर जिल्हा मध्यवर्ती बॅकेच्या कर्मचाऱ्यांना मे, २०१४ पासून महागाई भत्ता व जुलै, २०१५ पासून वार्षिक वेतनवाढ देणे बंद केल्याचे दिनांक १८ ऑगस्ट, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर बॅकेतील कर्मचाऱ्यांना वेतनवाढ न मिळाल्यामुळे कर्मचारी १ सप्टेंबर पासून आंदोलनाच्या पवित्र्यात असल्याचे दिसून आले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर बॅकेतील कर्मचाऱ्याना वेतनवाढ व महागाई भत्ता मिळण्यासंबंधी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (२५-०३-२०१९) :** (१) होय.

(२) होय,

परंतु सद्य:स्थितीत कर्मचाऱ्यांचे आंदोलन स्थगित आहे.

(३) राज्यातील नागपूर, वर्धा व बुलढाणा या तीन जिल्हा मध्यवर्ती सहकारी बॅंकांनी रिझर्व्ह बॅंकेने दिलेल्या निकषांची पुर्तता केली नसल्याने रिझर्व्ह बॅंकेने बॅंकींग रेग्युलेशन ॲक्ट १९४९ चे कलम ३५ अ अन्वये दिनांक ०९/०५/२०१२ रोजी निर्बंध लागू केले. परवाना मिळविण्यासाठीच्या आवश्यक अटींची पुर्तता करण्यासाठी नागपूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बॅंकेस शासनाने/नाबार्डने जिल्हा बॅंकांचे सक्षमीकरण योजनेंतर्गत अर्थसहाय्य केल्याने बॅंकेस परवाना प्राप्त झाला आहे. यावेळी केंद्र शासन, राज्य शासन व नाबार्ड यांच्यातील सामंजस्य करारानुसार व्यवहार्य व्यवसाय पातळी गाठेपर्यंत खर्च कपातीच्या उपाययोजना करणे आवश्यक होते, त्यानुसार बॅंकेने कर्मचाऱ्यांचा मे, २०१४ पासून महागाई भत्ता व जुलै, २०१५ पासून वार्षिक वेतनवाढ देणे तात्पुरते स्थगित ठेवले होते.

सदर प्रकरणी छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजनेंतर्गत बँकेस मोठ्या प्रमाणात थकीत रकमेची वसुली झाल्याने बँकेने कर्मचाऱ्यांचा स्थगित ठेवलेला महागाई भत्ता व वार्षिक वेतनवाढ माहे सप्टेंबर, २०१८ चे वेतनातुन अदा करणे सुरु केलेला असून मे, २०१४ पासून महागाई भत्ता व जुलै, २०१५ पासून वार्षिक वेतनवाढीची माहे ऑगस्ट, २०१८ पर्यंतची थकबाकी देणे बाकी आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## आचार्य विनोबा भावे भुदान चळवळीत मिळालेली जागा अशासकीय संस्थांना देऊन गैरव्यवहार केल्याबाबत

**(३७) ४४१०७ (३०-११-२०१८). श्री.जगन्नाथ शिंदे, श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) आचार्य विनोबा भावे यांच्या भुदान चळवळीत मिळालेली २०.८ हेक्टर जमीन भूदान यज्ञ अधिनियम १९५३ चे कलम ३ अन्वये भूमिहीन शेतमजुरास जमीन देण्याची तरतूद असताना सदरहू जमीन भूदान यज्ञ मंडळाच्या अध्यक्षांनी नियमांचे उल्लघंन करुन दिनांक २० मे, १९७७ रोजी वर्धा येथील शेतकरी शिक्षण प्रसारक मंडळाला वर्धा तालुक्यातील जऊळगाव येथील १.६२ हेक्टरचा एक पट्टा देण्यात आला, तर उर्वरित सातही पट्टे अशासकीय संस्थांना मागील चार वर्षात देण्यात आल्याचे माहे जुलै, २०१८ च्या शेवटच्या आठवड्यात निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर प्रकार भूदान यज्ञ मंडळाचे पदाधिकारी, कर्मचारी व स्थानिक महसूल अधिकारी यांच्या संगनमताने केल्याचेही निदर्शनात आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन दोंषीवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२८-०३-२०१९) :** (१), (२) व (३) भूदान यज्ञ मंडळ यांनी मौजा जऊळगाव, ता.व जि.वर्धा येथील जुना सर्व्हे क्र.७७,७८,७९/३ आणि नवीन सर्व्हे नं.५३ मधील क्षेत्र १.६२ हे.आर.जमीन अध्यक्ष, शेतकरी शिक्षण प्रसारक मंडळ कर्मचारी व्यवसायी संस्था, वर्धा यांना दिनांक २० मे, १९७७ रोजी वाटप केली असून त्याची फेरफार क्रमांक ३२, दिनांक ११/११/१९९३ नुसार नोंद घेण्यात आली आहे. या व्यतिरिक्त मौजा जऊळगाव, ता.व जि.वर्धा येथील भूदान जमिनी इतर अशासकीय संस्थांना दिल्याची नोंद नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सामाजिक न्याय विभागामार्फत विद्यार्थ्यांच्या खात्यावर जमा केलेल्या रकमा संबंधित शाळांना कळविणेबाबत

**(३८) ४४२६५ (०५-१२-२०१८). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.बाळाराम पाटील, श्री.श्रीकांत देशपांडे :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासनाच्या सामाजिक न्याय विभागामार्फत विद्यार्थ्यांना विविध शिष्यवृत्या दिल्या जात असून या शिष्यवृत्यांचे प्रस्ताव शाळामार्फत कार्यालयाकडे सादर केले जातात, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर शिष्यवृत्यांच्या रकमा शाळांना न कळविता विद्यार्थ्याच्या खात्यावर परस्पर जमा केल्या जात असल्यामुळे सदर शिष्यवृत्यांच्या रकमा शाळांना न कळविल्यामुळे पालकांना शाळेकडून माहिती मिळू शकत नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, या शिष्यवृत्या मंजूरीबाबतची माहिती शाळाकडे उपलब्ध होण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (१३-०३-२०१९) :** (१) हे खरे आहे.
(२) हे खरे आहे.

(३) शिष्यवृत्तीचा लाभ मंजूर केलेल्या विद्यार्थ्यांबाबतची माहिती संबंधित शाळा/महाविद्यालयांना अवगत करुन देण्याबाबतच्या आवश्यक त्या सूचना प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, सहायक आयुक्त, समाजकल्याण व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, सर्व जिल्हा परिषद यांना आयुक्तालयामार्फत देण्यात आल्या आहेत.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## यवतमाळ येथील संत गाडगेबाबा नागरी सहकारी पतसंस्थेत झालेल्या अपहारासंदर्भात फौजदारी कारवाई करण्याबाबत

**(३९) ४४७६७ (०५-१२-२०१८). प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) यवतमाळ येथील संत गाडगेबाबा नागरी सहकारी पतसंस्थेत झालेल्या चार कोटींचा अपहाराबाबत विशेष लेखा परिक्षणात आढळून आल्यानंतर या संस्थेचे अध्यक्ष, तत्कालीन उपाध्यक्ष व व्यवस्थापकांविरुध्द फौजदारी कारवाई करण्याबाबतची शिफारस केली असल्याची बाब माहे सप्टेंबर, २०१८ च्या शेवटच्या आठवड्यात निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, विशेष लेखा परिक्षकांनी केलेल्या शिफारसीनुसार उक्त संस्थेवर नियुक्त असलेल्या प्रशासकांनी याप्रकरणी कोणतीही कारवाई केलेली नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, गुन्हे नोंदविण्यास दिरंगाई करणाऱ्या व पतसंस्थेमध्ये रक्कमेचा अपहार करणाऱ्यांविरुध्द शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे, तसेच पतसंस्थेच्या अध्यक्ष, तत्कालीन उपाध्यक्ष व व्यवस्थापकांविरुध्द कधीपर्यंत फौजदारी कारवाई होणे अपेक्षित आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (२२-०३-२०१९) :** (१) होय.
(२) व (३) सदर संस्थेचे सन २०१०-११ ते सन २०१५-१६ या कालावधीचे चाचणी लेखापरिक्षण करण्यासाठी जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, यवतमाळ यांनी दिनांक २४/१०/२०१७ च्या आदेशान्वये शासकीय लेखापरिक्षकांची नियुक्ती केली.

दरम्यान, संस्थेच्या ११ संचालकांपैकी ९ संचालकांनी राजीनामे दिल्याने सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था, यवतमाळ यांनी त्यांच्या दिनांक २३/११/२०१७ रोजीच्या आदेशान्वये संस्थेवर प्रशासकाची नियुक्ती केली. चाचणी लेखापरिक्षणादरम्यान रुपये ४.२५ कोटींचा अपहार झाल्याचे निदर्शनास आल्याने संस्थेच्या सभासदांनी चाचणी लेखापरिक्षण अंतिम होण्यापूर्वीच संस्थेच्या १७ संचालकांविरुध्द पोलीस स्टेशन वडगांव रोड, यवतमाळ येथे दिनांक ७/०३/२०१८ रोजी एफआरआय क्र.०२३४ दाखल केला आहे.

चाचणी लेखापरिक्षणामध्ये नमूद केलेल्या अनियमिततेच्या अनुषंगाने संबंधितांची महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० च्या कलम ८८ अन्वये चौकशी करण्यासाठी दिनांक १२/१०/२०१८ रोजीच्या आदेशान्वये प्राधिकृत अधिकाऱ्याची नियुक्ती करण्यात आलेली आहे. तसेच संबंधितांवर गुन्हे दाखल करणेबाबत पोलीस स्टेशन अवधूतवाडी, यवतमाळ यांना विशेष लेखापरिक्षक वर्ग-२, सहकारी संस्था, वर्धा यांनी दिनांक ११/१२/२०१८ रोजीच्या पत्रान्वये कळविले आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## ठाणे जिल्ह्यातील जिल्हा परिषद शाळांना जिल्हा वार्षिक योजना अपारंपरीक योजनेंतर्गत सोलार सुविधेबाबत

**(४०) ४४८१३ (०५-१२-२०१८). ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **नवीन व नवीकरणीय ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सन २०१७-१८ मध्ये जिल्हा वार्षिक योजना अपारंपरीक योजनेंतर्गत ठाणे जिल्ह्यातील जिल्हा परिषद शाळांना सोलार सुविधा मिळण्याबाबतचा निधी किती व केव्हा प्राप्त झाला आहे,

(२) असल्यास, सदर योजनेत किती जिल्हा परिषद शाळांचा समावेश करण्यात आला असून सदर योजना प्रलंबित राहण्याचे कारण काय,

(३) असल्यास, ठाणे जिल्ह्यातील सदर मंजूर शाळांना सोलार सुविधा उपलब्ध करून देण्याबाबत शासनाने काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (१३-०३-२०१९) :** (१) सन २०१७-१८ मध्ये जिल्हा नियोजन मंडळाकडून अपारंपारिक ऊर्जा विकास कार्यक्रमांतर्गत एकूण ४००.०० लक्ष निधी प्राप्त झाला त्यापैकी जि.प. शाळांचे सौर ऊर्जेव्दारे विद्युतीकरणासाठी दर्शविण्यात आलेला रुपये १००.०० लक्ष निधी दिनांक ३/२/२०१८ रोजी प्राप्त झाला.

(२) सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात एकूण १२९ जि.प. शाळांना सौर ऊर्जाव्दारे विद्युतीकरणाचे आदेश देण्यात आले होते. त्यापैकी मार्च-२०१८ अखेर ९६ शाळांचे काम पूर्ण झाले आहे. ३३ शाळांचे काम अपूर्ण राहिले.

ठेकेदाराचा कामाचा वेग मंद असल्याने मार्च अखेर काम प्रलंबित राहिले आहे.

(३) व (४) अपूर्ण कामे पूर्ण करण्याबाबत निविदाधारकाकडे पाठपुरावा करण्यात येत आहे. सदर अपूर्ण कामाचे पूर्णत्वाचे अहवाल प्राप्त झाल्यानंतर कार्यान्वयन आदेशात नमुद दंड निविदाधारकावर आकारण्याचे नियोजित आहे. निधीच्या वापरात अनियमितता झालेली असल्यास त्याची चौकशी करून कार्यवाही करण्याचे जिल्हाधिकारी, ठाणे यांना आदेशित करण्याचेही नियोजन आहे.

---

## वसई (जि.पालघर) येथे वैद्यकीय महाविद्यालय सुरु करण्याबाबत

**(४१) ४५१३४ (०५-१२-२०१८). श्री.रविंद्र फाटक :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वसई (जि.पालघर) येथे वैद्यकीय महाविद्यालय सुरु करावे अशी मागणी शासनाकडे करण्यात आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्यावर काय निर्णय घेण्यात आला आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (१५-०३-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे. पालघर जिल्ह्यात नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय सुरु करण्याबाबत निवेदन प्राप्त झाले आहे.

(२) वसई (जि.पालघर) येथे शासकीय वैद्यकीय महाविद्यालय सुरु करण्याची बाब तूर्त शासनाच्या विचाराधीन नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील दिव्यांग (अपंग) प्रवर्गातील शाळांना शासनाने अभ्यासक्रम ठरवून न दिल्याबाबत

**(४२) ४५२२५ (०५-१२-२०१८). डॉ.सुधीर तांबे, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, ॲड.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील, डॉ.वजाहत मिर्झा, श्री.विक्रम काळे, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील सामाजिक न्याय विभागामार्फत चालविण्यात येणाऱ्या सर्व दिव्यांग (अपंग) प्रवर्गातील शाळांना शासनाने अभ्यासक्रम ठरवून दिलेला नाही, प्रत्येक शाळेमध्ये वेगवेगळया पध्दतीने शिकविले जाते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, शाळांना अभ्यासक्रम नसल्यामुळे विद्यार्थी व शिक्षक यांच्यामध्ये संभ्रमाचे वातावरण निर्माण झाले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, शासन सर्व दिव्यांग (अपंग) शाळांना एकसमान अभ्यासक्रम तयार करण्याचा विचाराधीन आहे काय,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (१४-०३-२०१९) :** (१) नाही.
(२), (३) व (४) प्रश्नच उद्भवत नाही.

---

## पळसोना (ता.हिंगोली) येथील शेतकऱ्यांना बँकेने कर्ज देण्यास नकार दिल्याबाबत

**(४३) ४५५८६ (०५-१२-२०१८). श्री.रामराव वडकुते, श्री.ख्वाजा बेग, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पळसोना (ता.हिंगोली) येथील शेतकऱ्यांना हिंगोलीतील पंजाब नॅशनल बँकेने पीक कर्ज देण्यास नकार दिल्याची तक्रार माहे सप्टेंबर, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान मा.पालक मंत्री यांच्याकडे निवेदनाद्वारे केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, पीक कर्ज नाकारण्याची कारणे काय आहेत,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व शेतकऱ्यांना पीक कर्ज मंजूर करण्याबाबत कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (२५-०३-२०१९) :** (१) अंशतः खरे आहे.

मा.पालकमंत्री हिंगोली यांच्याकडे दिनांक ०१/०७/२०१८ रोजी पळसोना गावातील ११ शेतकऱ्यांनी पीक कर्ज मिळत नसल्याबाबत निवेदन दिले आहे
(२) बँकेच्या अंतर्गत मार्गदर्शक सूचनेप्रमाणे २५ किमीपेक्षा जास्त अंतर असलेल्या गावामध्ये कृषी कर्ज वाटपास निर्बंध घातलेले आहे व पळसोना हे गाव २५ किमीच्या हद्दीच्या बाहेर येत असल्याने या गावास पीक कर्जवाटप करता येत नसल्याचे शाखा व्यवस्थापक, पंजाब नॅशनल बँक शाखा हिंगोली यांनी व्यवस्थापक जिल्हा अग्रणी बँक, हिंगोली यांना कळविले आहे.
(३) पळसोना ता.हिंगोली या गावातील शेतकऱ्यांना विविध कार्यकारी सेवा सहकारी संस्था मर्या. कोळसुना, महाराष्ट्र ग्रामीण बँक शाखा सिरसम बु., युनियन बँक ऑफ इंडिया शाखा हिंगोली, सिंडीकेट बँक शाखा शाखा हिंगोली या बँकांनी २१५ खातेदारांना रुपये ५४,१३,७४५/- चे पीक कर्ज वाटप केलेले आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## रायगड जिल्हयात ए.एन.एम/जी.एन.एम.
## (नर्सींग कोर्स) प्रवेश प्रक्रियेबाबत

**(४४) ४५६३२ (०५-१२-२०१८). श्री.धनंजय मुंडे, श्री.अनिकेत तटकरे, श्री.जगन्नाथ शिंदे :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) रायगड जिल्ह्यात ए.एन.एम/जी.एन.एम. (नर्सिंग कोर्स) प्रवेश प्रक्रियासंदर्भात काही तक्रारी प्राप्त झाल्या असून ही प्रवेश प्रक्रिया पारदर्शक पध्दतीने झालेली नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, पुरुष व महिला प्रवेशाचे प्रमाण यामध्ये योग्यरित्या राखले गेले नसून रायगडसह महाराष्ट्रात इतर ठिकाणीही अशीच प्रवेश प्रक्रिया राबविली गेली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (१५-०३-२०१९) :** (१) हे खरे नाही.
(२), (३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्य व राष्ट्रीय पुरस्कार प्राप्त अंध अपंग शिक्षकांना बक्षिस म्हणून दोन वेतनवाढ देण्याबाबत

**(४५) ४५६४३ (०५-१२-२०१८). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) गुणवंत राज्य व राष्ट्रीय पुरस्कार प्राप्त शिक्षकांना बक्षिस म्हणून दोन वेतनवाढ देण्यात येत होती, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, ६ व्या वेतन आयोगापासून सदर पुरस्कार रोख स्वरुपात देऊन शासनाने वेतनवाढ बंद केली परंतु बऱ्याच शिक्षकांनी पुरस्काराचे हे स्वरूप नाकारून पूर्वीप्रमाणे दोन वेतनवाढी मिळण्याबाबत आग्रह धरला असून शासनाच्या शिक्षण विभागाने सन २०१०-११ ते २०१५-१६ या दरम्यान दोन वेतनवाढ देण्याचा निर्णय निर्गमित केला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, अंध अपंग राज्य व राष्ट्रीय पुरस्कार प्राप्त शिक्षक व्यक्तीसाठी शिक्षण विभागाप्रमाणे सामाजिक न्याय विभाग सुद्धा असाच निर्णय घेणार आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (१४-०३-२०१९)** : (१) व (२) होय.
(३) राष्ट्रीय अपंग पुरस्कार प्राप्त कर्मचाऱ्यांना दोन आगाऊ वेतन वाढी व राज्य अपंग पुरस्कार प्राप्त कर्मचाऱ्यांना एक आगाऊ वेतनवाढ शासन निर्णय दिनांक २९/१२/१९९३ नुसार देण्यात येत आहे.
(४) व (५) प्रश्नच उद्‌भवत नाही.

---

## रांजनगांव शेनपुंजी (ता.गंगापूर, जि.औरंगाबाद) येथील जमीन गैरव्यवहाराबाबत

**(४६) ४५९७७ (३०-११-२०१८). श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे** : सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) रांजनगांव शेनपुंजी (ता.गंगापूर, जि.औरंगाबाद) येथील गट नं. ५ क्षेत्रफळ ३ एकर २६ गुंठे जमीन देवराव रावजी (एकत्र कुटुंबकर्ता) यांचे नावे ७/१२ वर नोंद आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर जमिनीबाबत महसूल न्यायालयात (तहसिलदार वैजापूर) यांनी किशन काशिनाथ बोऱ्हाडे यांच्या बाजूने निकाल दिला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सन २०१३ मध्ये उपविभागीय अधिकारी, वैजापूर यांनी मृत किशन बोऱ्हाडे यांच्या वारसाच्या बाजूने निकाल दिला असून सन २०१६ मध्ये अप्पर जिल्हाधिकारी, औरंगाबाद यांनी मृत किसन बोऱ्हाडे यांची पत्नी राहीबाई व केसरबाई यांच्या बाजूने निकाल देवून कार्यवाही करण्याचे आदेश दिले आहेत, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, सदर आदेशानुसार गंगापूर तहसिलचे तत्कालीन तहसिलदार व तलाठी यांनी आर्थिक गैरव्यवहार करुन श्रीमती राहीबाई/केसरबाई यांचे नावे फेर न घेता त्रयस्त व्यक्तीच्या नावे फेर घेतला (फेर क्र. १४०५) आहे, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन गैरव्यवहार करणारे संबंधित तत्कालीन तहसिलदार व तलाठी यांच्यावर कारवाई करुन फेर क्र.१४०५ रद्द करुन श्रीमती राहीबाई/केसरबाई यांचे नावाने फेर घेण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२८-०३-२०१९)** : (१) जिल्हाधिकारी औरंगाबाद यांचेकडील उपलब्ध अभिलेखानुसार मौजे रांजनगाव शेनपुंजी, ता.गंगापूर, जि.औरंगाबाद येथील गट नं.५ क्षेत्र १.३३ हे.आरच्या गा.न.नं. ७/१२ च्या मालकी हक्कामध्ये देवराव रावजी बोऱ्हाडे यांची सन १९७४-१९७५ ते १९८२-१९८३ पर्यंत मालकी हक्क नोंद आहे. परंतु सदरील नावासमोर एकत्र कुटुंबकर्ता म्हणून नोंद दिसून येत नाही.
(२) तत्कालिन तहसिलदार, गंगापूर यांनी त्यांचे आदेश दिनांक २४/१०/२००३ अन्वये श्री.किसन काशिराम बोऱ्हाडे यांचे मौजे रांजनगाव शेनपुंजी गट नं. ५ मधील ३ एकर २६ गुंठे मधील वहित क्षेत्राचा नोंदबाबतचा अर्ज मंजूर केलेला आहे.
(३) श्रीमती केशरबाई किसन बोऱ्हाडे व राहीबाई किसन बोऱ्हाडे यांनी उपविभागीय अधिकारी, वैजापूर यांच्याकडे मौजे रांजनगाव शेनपुंजी, ता.गंगापूर, जि.औरंगाबाद येथील गट नं.५ मधील क्षेत्र ३ एकर २६ गुंठे जमिनीबाबत वंशपरंपरागत वहिती असल्यामुळे अपिलार्थीच्या नावाचा मालकी हक्कात अंमल करणेबाबत अपील दाखल केले होते. सदर प्रकरणी उपविभागीय अधिकारी, वैजापूर यांनी दिनांक १६/११/२०१३ रोजी अपिलार्थीचे अपील अंशत: मान्य करून तहसिलदार, तलाठी यांनी अर्जदाराकडून रितसर सक्षम कार्यालयाचे मृत्यूप्रमाणपत्र, वारसप्रमाणपत्र इ. वारस कार्यवाहीसाठी आवश्यक ते कागदपत्र घ्यावे. रितसर गा.न.नं. ६ ‘क’ ची मंजूरीबाबतची कार्यवाही करण्यात यावी असा आदेश पारित केला आहे.

उपविभागीय अधिकारी, वैजापूर यांचे उक्त आदेशाविरूध्द देवराव रावजी बोऱ्हाडे व मुरलीधर यमाजी बोऱ्हाडे यांनी अपर जिल्हाधिकारी, औरंगाबाद यांच्याकडे म.ज.म.सं.१९६६ चे कलम २४७ नुसार द्वितीय अपील दाखल केले. सदर प्रकरणी अपर जिल्हाधिकारी, औरंगाबाद यांनी दिनांक ०५/०५/२०१६ रोजी

अपिलार्थी यांचे अपील नामंजूर करून वारसांचे नोंदी घेण्याबाबत संबंधितांनी आवश्यक कागदोपत्री पुरावे दाखल केल्यास, तहसिलदार गंगापूर यांनी उभयतांना संधी देवून नियमानुसार योग्य तो निर्णय पारित करावा असे आदेश पारित केले आहेत.

(४) देवराव रावजी बोऱ्हाडे हे दिनांक ०१/०९/२०१५ रोजी मयत झाल्याने त्यांचे वारसांनी तहसिलदार, गंगापूर यांच्याकडे वारस कार्यवाहीसाठी अर्ज सादर केला होता.त्यानुसार तत्कालिन तहसिलदार, गंगापूर यांनी दिनांक १४/०७/२०१७ रोजी निर्णय पारित करून वादी देवराव रावजी बोऱ्हाडे (मयत) यांचे वारस रामनाथ देवराव बोऱ्हाडे व इतर ५ यांचा अर्ज मंजूर केला. तसेच अपर आयुक्त, औरंगाबाद यांचे निर्णयानुसार तलाठी यांनी देवराव रावजी बोऱ्हाडे (मयत) यांची वारस नोंद घेण्याची कार्यवाही करावी. प्रतिवादी गैरअर्जदार श्रीमती केसरबाई किसन बोऱ्हाडे व श्रीमती राहीबाई किसन बोऱ्हाडे यांचा अर्ज निकाली काढून त्यांनी त्यांचे मालकी हक्क सक्षम न्यायालयातून सिध्द केल्यानंतर वारस कार्यवाहीसाठी अर्ज करावा असे आदेशित केले. सदर प्रकरणी तहसिलदार, गंगापूर यांचे दिनांक १४/०७/२०१७ चे आदेशानुसार तलाठी सजा, रांजणगाव शेणपुंजी यांनी फेरफार क्र. १४०५ नुसार मयत देवराव रावजी बोऱ्हाडे यांचे वारस म्हणून यमुनाबाई देवराव बोऱ्हाडे व इतर ६ यांचे नावाची वारस नोंद केली. मंडळ अधिकारी यांनी दिनांक १५/१०/२०१७ रोजी गाव नमुना ६ 'क' नुसार फेरफार क्र. १४०५ मंजूर केलेला आहे.

(५) तहसिलदार, गंगापूर यांचे निर्णयाविरूध्द अपिलार्थी श्रीमती केशरबाई किसन बोऱ्हाडे व राहीबाई किसन बोऱ्हाडे व इतर यांनी उपविभागीय अधिकारी, वैजापूर व अपर जिल्हाधिकारी, औरंगाबाद यांचेकडे दाखल केलेले अपील नामंजूर केले असून अपिलार्थी श्रीमती केशरबाई किसन बोऱ्हाडे व राहीबाई किसन बोऱ्हाडे व इतर यांनी त्यांच्या मालकी हक्कात सक्षम न्यायालयात दाद मागण्याबाबत आदेशित केलेले आहे.

(६) प्रश्न उद्भवत नाही.

---

## निमवैद्यकीय कृती समिती, महाराष्ट्र राज्य यांनी अपंगांच्या अनुदानित जुन्या विशेष शाळेतील अर्धवेळ निमवैद्यकीय कर्मचारी यांच्या मागण्याबाबत

**(४७) ४६००१ (०५-१२-२०१८). श्री.कपिल पाटील :** सन्माननीय **विशेष सहाय्य मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अपंगांच्या अनुदानित विशेष शाळेतील अर्धवेळ निमवैद्यकीय कर्मचारी यांना पूर्वलक्षी प्रभावाने पूर्णवेळ करण्याबाबत व ६ व्या वेतन आयोगानुसार फरक मिळण्याबाबत निमवैद्यकीय कृती समिती, महाराष्ट्र राज्य यांनी मागण्या केल्या आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्यांच्या मागण्यांचे स्वरुप काय आहे व त्याबाबत शासनाने काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (१५-०३-२०१९) :** (१) होय.

(२) शासनस्तरावर कार्यवाही सुरु आहे.

(३) प्रश्नच उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकातील गरीब कुटुंबाना रमाई आवास योजनेंतर्गत घरकुले मंजूर केल्याबाबत

**(४८) ४६१०८ (०५-१२-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकातील गरीब कुटुंबाना रमाई आवास योजनेंतर्गत सन २०१८-१९ या वर्षात तब्बल १ लाख १ हजार ७१४ घरकुले मंजूर करण्यात आली असल्याची माहिती मा.सामाजिक न्याय मंत्री महोदयांनी माहे सप्टेंबर, २०१८ च्या चौथ्या आठवड्यात दिली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणाची शासनाने चौकशी केली आहे काय व चौकशीच्या अनुषंगाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (१२-०३-२०१९) :** (१) होय,
सन २०१८-१९ या वर्षाकरीता शासनाने रमाई आवास योजनेसाठी ग्रामीण व नागरी क्षेत्राकरीता खालीलप्रमाणे उद्दिष्ट मंजूर केले आहेत :-

| **क्र.** | **क्षेत्र** | **मंजूर उद्दिष्ट** |
|---|---|---|
| १ | ग्रामीण | ९०,८७६ |
| २ | शहरी | १०,८३८ |
| | **एकूण** | **१,०१,७१४** |

(२) योजनेच्या अंमलबजावणीसाठी, दिनांक २४ ऑगस्ट, २०१८ अन्वये उद्दीष्ट मंजूर करण्यात आले आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील आत्महत्याग्रस्त शेतकरी कुटुंबियांच्या वारसदारांची वारस नोंद अनेक वर्षे प्रलंबित असल्याबाबत

**(४९) ४६३७८ (३०-११-२०१८). श्री.आनंदराव पाटील** : सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात आत्महत्याग्रस्त शेतकऱ्यांच्या वारसदारांची वारस नोंद अनेक वर्ष होत नसल्याने अनेक शेतकऱ्यांच्या विधवा पत्नीला जमिनीतून व घरातून बेदखल करण्याचे प्रकार निदर्शनास आले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन वारस नोंदीची मोहिम राबविण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२८-०३-२०१९) :** (१) अशी बाब निदर्शनास आलेली नाही.
(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## आदिवासींच्या आरक्षित जागेवर गैर आदिवासी शिक्षकांच्या केलेल्या नियुक्त्या रद्द करण्याबाबत

**(५०) ४८८२७ (०७-०२-२०१४). श्री.नागोराव गाणार** : सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) आदिवासींच्या आरक्षित जागेवर गैरआदिवासी शिक्षकांच्या नियुक्त्या करुन त्यांना मान्यता दिल्याबद्दल दोन समाजकल्याण अधिकाऱ्यांना निलंबित करुन देखील गैरआदिवासी शिक्षकांची मान्यता काढण्यात आलेली नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, गैरआदिवासी शिक्षकांची मान्यता न काढता तसेच कु.नालंदा शहारे यांनी मा.मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथून स्थगनादेश मिळविले त्यामुळे त्यांचे वेतन थांबवून उर्वरित ७ कर्मचाऱ्यांचे ३६ महिन्याचे वेतन तत्कालीन समाजकल्याण अधिकारी श्री.सुरेन्द्र पवार व त्यांचे सहाय्यक सल्लागार श्री.मिलिंद रामटेके यांनी काढले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, आयुक्त, अपंग कल्याण आयुक्तालय, पुणे यांचे पत्र दिनांक १८ मार्च, २०१०, दिनांक १६ सप्टेंबर, २०१२ व दिनांक ६ ऑगस्ट, २०११ तसेच प्रधान सचिव, सामाजिक न्याय विभाग, महाराष्ट्र शासन, मुंबई यांचे पत्र दिनांक २७ डिसेंबर, ०१० रोजीच्या पत्रान्वये या गैरआदिवासी शिक्षकांची मान्यता रद्द करण्याचे आदेश दिले असतानासुध्दा या आदेशाची अवहेलना करुन तत्कालीन समाजकल्याण अधिकारी श्री.सुरेन्द्र पवार व त्यांचे सहाय्यक सल्लागार श्री.मिलिंद रामटेके यांनी त्या कर्मचाऱ्यांची मान्यता काढलेली नाही, हे खरे आहे काय ?

**श्री.राजकुमार बडोले (१५-०३-२०१९) :** (१) होय.

(२) नाही.

(३) होय. शासनाचे तसेच आयुक्त, अपंग कल्याण आयुक्तालय, पुणे यांचे गैरआदिवासी शिक्षकांच्या मान्यता रद्द करण्याचे आदेश प्राप्त झाल्यानंतर श्री.सुरेंद्र पवार, जिल्हा समाजकल्याण अधिकारी यांनी संबंधित नियुक्त्या रद्द करण्याबाबत कारणे दाखवा नोटीस बजावली असता संस्थेने रिट याचिका क्र १०६७/२०१२ व १०८८/२०१२ अन्वये उच्च न्यायालय खंडपीठ नागपूर येथे

आव्हान दिले. त्यावर मा.उच्च न्यायालयाने सदर नोटीसीला स्थगिती देवून जिल्हा समाजकल्याण अधिकारी यांनी स्वत: निर्णय घ्यावा या आदेशासह याचिका निकाली काढल्या.

दरम्यान एकूण ५ याचिकाकर्त्यांनी मा.उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथे प्रलंबित वेतन मिळण्याबाबत रिट याचिका दाखल केली होती. सदर रिट याचिकेवर मा.उच्च न्यायालयाने दिनांक २ जुलै, २०१४ रोजीच्या आदेशान्वये कु.नालंदा शहारे यांचे वेतन अदा करणेबाबत निर्देश दिले होते.

तसेच अनुसूचित जमातीमधील उमेदवार मिळत नसल्याने ज्या नियुक्त्या केल्या आहेत त्या नियुक्त्या मा.न्यायालयाने वैध ठरवत अन्य चार याचिकाकर्त्यांनासुध्दा दिनांक ३०/१०/२०१४ रोजी प्रलंबित वेतन अदा करण्याचे निर्देश दिले.

---

**विधान भवन :**
**मुंबई.**

**जितेंद्र भोळे**
**सचिव (कार्यभार),**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.